


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्धारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्धारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्धारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका












अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३३७ जुलै ते सप्टेंबर २०११

संपादक

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**

प्रकाशक

**प्रा. मिलिंद जोशी**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०

दूरभाष ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका




मुद्रक-प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी,**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**एच्. एम्. टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : सप्टेंबर, २०११

संपादकीय

# शब्दवती!

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

ऋग्वेदाच्या ऐतरेय-आरण्यकात मनुष्याच्या शरीराशी वीणावाद्याची तुलना केली आहे. 'अथ खलु अयं दैवी-वीणा भवती, तदनुकृतिइयं मानुषी वीणा भवति ।...' वीणा हे सरस्वतीच्या हाती नित्य झंकारत असलेले दैवी-वाद्य आहे. तिच्या कृपाप्रसादाने अर्थात् प्रतिभाशक्तीने ही मानुषी-वीणा संगीत, नृत्य-गायन, चित्रकला, नाट्यकला, साहित्यकला इत्यादी १४ विद्या आणि ६४ कलारूपाने प्रकटते. वीणेच्या 'शिर'स्थानी असलेला भोपळा मनुष्याच्या शिराप्रमाणे, 'यथाऽस्या: शिर इव मनुष्या: शिर: ।', वीणेचे 'अम्भण' मनुष्याच्या उदराप्रमाणे ('यथाऽस्या उदरमेवमनुष्या अम्भणं ।'), वीणेच्या तारांना स्थिर ठेवणारी 'जीभ' (वाद्याचा एक भाग) म्हणजे मानवी जीभ (वादन) ('यथाऽस्यै जिव्हा एवमनुष्यै वादनं ।'), वीणेचा 'स्वर' मानवी स्वरयंत्राप्रमाणे ('यथाऽस्या: स्वरा एव मनुष्या: स्वरा: ।') ...वीणेच्या 'तंत्री' (तारा) म्हणजे मनुष्याची बोटे ('यथाऽस्यास्तन्त्रय एवमनुष्या अङ्गुलय: ।') ... इत्यादी वीणावाद्याच्या भिन्न अवयवांचे पारिभाषिक शब्द मानवी देहाशी, मानवाच्या स्वरभावनेशी एकरूप झालेले आहेत. केवळ रूपकावर थांबता येत नाही. हा 'अपह्नुति' आहे. शारदेच्या अंगुली-स्पर्शाने झंकारणारी वीणा, ही वीणा नसून... केवळ अनुकृती नसून... माणसाच्या नश्वर शरीरातील दैवी-भावरस, अनाहत नादातून झंकारणारी वेदवती-शब्दवती आणि कोणत्याही गीतालिपीत ('नोटेशन'मध्ये) बांधून ठेवता न येणारी 'भाववती' आहे.

मन अशरीरी भावरसाकडे ओढ घेते. हृदयस्थ भावरस प्रकट करण्यासाठी अखेर हृदय-वीणेचाच आधार मनुष्याच्या स्वाधीन केला आहे. म्हणून ती 'शब्दवती' आहे असे ऋग्वेदात म्हटले आहे. गायन हे ध्वनिरूप आहे. ते गात्रवीणेतूनच प्रकटावे हे जन्मजात सत्य आहे. त्यामुळे ते विकारवशही आहे. ध्वनींचे विकारही जन्मजात आहेत. शब्दरूप होतानाच ते माधुर्य-प्रसाद-दीप्ती यांपैकी कोणते ना कोणते तरी गुणरूप घेऊन विकारांच्या स्पर्शानेच प्रकट होतात. शुद्ध रागसंगीत गाणारे शब्दांना गौणत्व देतात. विकारवश शब्दांत म्हणजेच 'स्वरनाट्यात' गायन अडकले की गायन कमी दर्जाचे होते; अशी एक भूमिका घेतली जाते. खऱ्या गायकाचे हेच स्वप्न असते की, तो 'अशरीरी-स्वर' आपल्या गळ्यातून प्रकटावा! त्यासाठी कमीत-कमी शब्दांच्या चिजा केवळ स्वरांच्या आराधनेसाठी बांधल्या जातात, ते शास्त्रीय संगीत. नाट्यगीत आणि भावगीत गायन हे सुगमसंगीत! वास्तविक 'शब्दवती' गात्रवीणा, 'शब्देविण संवादु' चा अमृतानुभव देणारी 'दर्शन' शास्त्रातील ही शब्दरंजन प्रधान गायकी– भावगीताची!

ज्ञानानुभवामृतासाठी शब्दांचा आरसा ('दर्शन') दैवी कार्य करतो. 'बिंबा'चे दर्शन घेण्यासाठी 'प्रतिबिंबा'चाच आधार! मग ते कितीही आभासात्मक असले तरी सत्यदर्शन घडविणारे आहे. कोणत्या कोनातून आपली छबी छान दिसेल त्याचे 'सत्य'शोधन करण्यासाठीही त्या बिंबाच्या आभासाचाच उपयोग होतो. ज्ञानदेवांनी अनुभवामृतात ज्ञानाबरोबर अज्ञान, प्रकाशाबरोबर अंधार आणि बिंबाबरोबर प्रतिबिंबालाही तितकेच महत्त्व दिले आहे. अंधार (अज्ञान) ज्ञानाची/प्रकाशाची ओढ लावतो; आणि ज्ञान अंधाराला समजूनही घेते. ज्ञानाची आस असलेला श्रोता आणि आपले ज्ञान शब्दवान करणारा वक्ता किंवा गायक दोघेही श्रेष्ठच! त्याप्रमाणे भावगीतात स्वर आणि स्वरभावाला



अनुक्रमणिका

प्रकट करणारे शब्द, दोन्हीही श्रेष्ठच! स्वरभाव प्रकट करण्यासाठी मानुषी-वीणा 'शब्दवती' होते. उत्कट भावानंदाचा अमृतानुभव देणारे शब्द ज्या गीतात आहेत, ते भावगीत!

*'नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ ।*
*मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ।।'*

भावभक्तीने गाणाऱ्या भक्ताच्या हृदयात साक्षात् भगवान प्रकट होतो. तो नुसताच शब्दरूप नसतो. अनुभवामृताला शब्दरूप देणारा गीतकार हा श्रेष्ठ कवीच! ज्याचे भाव उत्स्फूर्तपणे छंदातून-वृत्तातून स्वाभाविकपणे 'शब्दवती' होतात, तो कवी! त्यातील भाव नाद-लय-ताल ज्याच्या शारीर-वीणेतून उतरतात तो गायक!! कवी-गायकाचे ब्रह्मानंदाशी नाते जुळवून देणारा तितकाच प्रतिभावान संगीतकार!!! ह्या तिघांच्या सुसंवादाने प्रकटते, ते भावगीत! भावगीत प्रकटविणारी मानुषी-गात्र-वीणा ही खऱ्या अर्थाने 'शब्दवती' होते. शुद्ध स्वरभावनेशी थेट नाते जुळविणारी भावगीत-गायकी आणि भावगीत, दोघेही श्रेष्ठच! ज्ञानाचे अनुभवामृत देणाऱ्या शब्दवती ग्रंथाला म्हणूनच 'भावार्थदीपिका' म्हटले आहे. ज्ञानदेवांनंतर भगवद्-गीतेला भावार्थापेक्षा यथार्थपणे प्रकट करण्याचा आग्रह धरणाऱ्या, 'यथार्थदीपिका' लिहिणाऱ्या, वामनपंडितांसारखे अनेक पंडित झाले. परंतु शेकडो वर्षे भावार्थदीपिकेलाच डोक्यावर घेतले आहे; कारण सर्वसामान्य भक्त तो दैवी ज्ञानानंद, 'भावार्थदीपिकेतून'च घेऊ शकतात. खऱ्या अर्थाने ते विदग्ध वाङ्मय आहे. 'प्रमेयांची उद्याने' लावीन, अशी ज्ञानदेवांची प्रतिज्ञा होती. सर्वसामान्यांना 'तत्त्वमसि'चा प्रत्यय देण्यासाठी प्राकृतातून केलेला प्रयास, लोकांनी आनंदाने डोक्यावर घेतला! त्याच अर्थाने भावगीतातून ती अशरीरी प्रसन्नता प्रत्ययाला येते. 'प्रसाद' हा भावगीताचा काव्यगुण आहे. आनंद व प्रसन्नतेचा सहजप्रत्यय भावगीतातून येतो; आणि मनाला गोड हुरहुरही लावतो. कवी गिरीशांनी आपल्या 'भास' ह्या कवितेत भावगीताचे रहस्य अलवार शब्दकळेतून प्रकट केले आहे. त्यातील एक अन्तरा–

*संङ्गीत लकेरी बहरे*
*आनंद अणूंतून पसरे*
*स्वर एकच हृदयवीणेला मम देई कल्पना*
*तव भास अन्तरा झाला मन रमतां, मोहना ।।*

मखमली मृदू तृणस्पर्शांनी, हसणाऱ्या फुलांनी, फळांच्या लालीने, मोहक अरुणकान्तीतून इ.च्या 'दर्शना'ने ते दैवी स्मितहास्य, तो हृदयपुष्पांचा दरवळ, आणि अनुराग ह्यांचा वारंवार दैवी भास होतो. ठायी ठायी दिसणारा हा भास सत्यरूपात मिळावा म्हणून अखंड हुरहुर मनाला लागते. ही मन:स्थिती भावगीताचे जन्मस्थान आहे. हीच भावगीताची दैवी प्रसन्नता प्रसादरूपाने, शब्दवती गात्रवीणेतून 'स्वादु स्वादु पदे पदे' प्रकटते, अनुभवावयास मिळते. 'प्रसादस्तु प्रसन्नता' हे गीतेचे वचन आहे. प्रसन्नता हाच प्रसाद! विदग्ध वाङ्मयाचे हेच फलित असते. भावगीतातून त्याचा प्रत्यय येतो.

तात्त्विक, ललित आणि विदग्धता असे वाङ्मयाचे तीन प्रकार आहेत. तात्त्विकाला लालित्याच्या माध्यमातून वाङ्मयरूप मिळते ते सर्वश्रेष्ठ साहित्य होय. रागसंगीताच्या तात्त्विक पायावर सर्वसामान्य रसिकांना स्वरप्रसन्नता देणारे भावगीतकार, भावगीत-गायक, आणि प्रतिभावान संगीतरचनाकार मिळून जो प्रसन्नतेचा 'प्रसाद' देतात; ते 'भावगीत'– हे विदग्ध वाङ्मयाच्या योग्यतेचे होय!

स्वरांकित शब्द हा भावगीताचा आत्मा आहे. कारण स्वरांचे सामर्थ्य, अवर्णनीय अशा पंचगुणात्मक शब्दांच्या, अनुभूतीत आहे. वर्ण, स्पर्श, रूपाकार, रस आणि गंध हे स्वरांच्या कंपनशक्तीतून प्रकट होतात. सर्वसामान्य श्रुतिसुख घेणाऱ्यांना भावगीतून याची प्रचीती येते; आणि 'नादा'चे वेड लावते. 'शब्द' हा त्याचा आधार आहे. ख्याल, नाट्यगीत, भावगीत, चित्रपटगीत यांच्या आधारे राग-संगीताचे



अनुक्रमणिका

भावसौंदर्य सामान्य रसिकांना आनंदित करते. श्रमपरिहार करते! केशवसुतांच्या 'सतारीचे बोल' या कवितेत या सामर्थ्याचेच चिंतन केले आहे. शास्त्रीय रागाचे ज्ञान नसलेली कुणी एक उदासीन मन:स्थितीतली व्यक्ती, सतारीच्या 'दिड्-दा' बोलांनी उल्हसित होते. ताऱ्यांनी उजळलेले आकाश पाहू लागते. रागांचे मनोभावांशी अतूट नाते आहे. दिवसाच्या आणि रात्रीच्या विविध वेळांशी, इतकेच काय रस-रंगाशीही अतूट नाते आहे! हे सत्य, सर्वसामान्य रसिकालाही परिचित आहे. भावनांना 'शब्दवती' करण्याचे सामर्थ्य भावगीतकाराच्या शब्दांत, गायकाच्या गळ्यात आणि संगीतकाराच्या सुमधुर रचनेत आहे. या तिघांचा एकत्रित आविष्कार म्हणजे भावगीत आहे. यांपैकी कुणीही एक वगळला तरी विरस होईल.

'अमृतानुभव' की 'अनुभवामृत' याची चर्चा वारंवार होते. अमृतासारखा अनुभव, अ-मृत असा अनुभव की, 'ती' दिव्यानुभूती देणारा अनुभव हेच अमृत! या विवर्तात सापडण्याचे काहीच कारण नाही. अनुभूती हाच 'शब्दवती'चा आधार आहे. अनुभूतीशिवाय शब्दांना अर्थ नाही! नाट्य, नृत्य, चित्र, संगीत हे शब्दानुभूतीचेच भावाविष्कार आहेत.

संगीतकार श्रीनिवास खळे यांच्या निधनाने साहित्यातील एका विदग्धतेची अखेर झाली आहे. त्यांच्या संगीतस्पर्शाने सर्वतोमुखी झालेली भावगीते अजरामर आहेत. प्रतिभावान् संगीतकाराच्या दिवंगत होण्याने भावगीताविषयी जे विचार स्फुरले ते रसिकांसमोर ठेवावेत म्हणून हे संपादकीय भावगीतालाच वाहिले. रागसंगीताच्या क्षेत्रात भावगीत-गायनाला सुगम म्हणून गौण तर लेखले जात नाही ना! ही माझी अज्ञ रसिकाची एक शंका आहे. हे गौणत्व शास्त्रीयदृष्ट्या मानले असले तरी भावगीताने तो अमृतानुभव सामान्यांच्या करतळावर ठेवला आहे हे विसरणे शक्य नाही. 'मागणी तसा पुरवठा करणारे' म्हणून गीतकाराचीही वासलात लावली जाते. छंदोबद्धता आणि वृत्तबद्धता उत्स्फूर्त असते. ते काव्यावरील बंधन नाही! त्याची भ्रष्ट नक्कल करणाऱ्यांमुळे त्याला गौणत्व आले. 'घटपदादि' करणारे कवी म्हणून त्यांचा उपहास होतो. गूढरम्यकाव्याचा प्रत्यय देणारे कवी ग्रेस यांनी वृत्तमयता आणि छंदोमयतेला उत्स्फूर्त प्राधान्य दिले आहे. शब्दांकडून अर्थापेक्षा भावरम्यतेची अपेक्षा करावी. ती भावरम्यताच सर्वांना आस्वाद्य असते. संगीतकाराच्या परिसस्पर्शाने आणि गायकाच्या गात्रवीणेतून ती शब्दवती होते – 'तर्ववती' होते – म्हणजे आकाशाच्या पोकळीलाही भरून काढते. 'शब्द' हा आकाशाचा गुणधर्म आहे. मेघांनी आकाश झांकोळते... अनामिक हुरहुरीने वर्षावाची ओढ लागते. मेघाच्छादित आकाश आपले हृद्गत प्रकट करण्यासाठी व्याकुळ होते. इंद्रधनुष्याच्या रूपाने ते आपला आत्मरंग प्रकट करू पाहते... त्यात समाधानी न झाल्याने की काय, ते व्यक्त होण्यासाठी गडगडू लागते. मग गर्जना करू लागते. जणू प्रसुति-वेणा! मग तडिताघाताने क्षणभरच प्रकाशाचे 'दर्शन' होते; आणि आनंदाच्या जलधारा बरसू लागतात! या दर्शनाने दैवी मानुष-वीणा 'शब्दवती' न झाली, तरच नवल!

(स्वाक्षरी)

संपर्क :
७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५

संपादक
महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०
भ्रमणभाष - ९७६७६९९३१९







अनुक्रमणिका

# वक्तृत्व आणि साहित्य

– प्रा. मिलिंद जोशी

*[ज्येष्ठ विचारवंत, ख्यातनाम वक्ते प्राचार्य शिवाजीराव भोसले यांच्या प्रथम स्मृतिदिनानिमित्त आयोजित महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा फलटण आयोजित विभागीय साहित्य संमेलन २०११ चे संमेलनाध्यक्ष - प्रा. मिलिंद जोशी यांचे अध्यक्षीय भाषण. स्थळ : महाराजा मंगल कार्यालय, फलटण दिनांक : २९ जून २०११].*

प्राचार्य शिवाजीराव भोसले यांनी वक्तृत्वाची आजन्म आणि अखंडितपणे साधना केली. 'आपुला तो एक देव करोनि घ्यावा' या संतवचनाप्रमाणे त्यांनी आपल्या जीवनातली सगळी ऊर्जा वक्तृत्वावर केंद्रित केली होती. प्रबोधनकार्यात वक्तृत्वाचे योगदान खूप मोलाचे आहे. कीर्तनसंस्थेने अडीच शतकांपासून महाराष्ट्राचे रंजन आणि उद्‌बोधन केले आहे. वक्तृत्व, साहित्य, नाट्य आणि संगीत यांचा सुरेख संगम कीर्तनकाराच्या ठायी असल्याशिवाय कीर्तन रंगायचे नाही. सार्वत्रिक शिक्षण आणि मुद्रणकला अस्तित्वात येण्यापूर्वी समाजाला ज्ञानार्जन आणि प्रबोधनासाठी 'श्रुती' हेच एकमेव माध्यम होते. अक्षरशिक्षण एका विशिष्ट वर्गापुरते मर्यादित होते. शिक्षणापासून वंचित राहिलेल्या बहुजनसमाजाला श्रवणाद्वारेच ज्ञान संपादन करावे लागत होते. कीर्तनात नाट्य आणि संगीताप्रमाणे वक्तृत्वाला अनन्यसाधारण महत्त्व आहे. वक्तृत्वाद्वारेच विचारांचे प्रभावी प्रतिपादन कीर्तनकाराला शक्य होत असे. ज्ञानसंपन्नतेचे चांदणे वक्तृत्वामुळेच प्रकट होत असे.

एखाद्याजवळ उदंड ज्ञान असते, पण ते इतरांपर्यंत पोहोचविण्यासाठी आवश्यक असलेली शब्दशक्ती नसते. अनेकांजवळ शब्दशक्ती असते, पण ज्याच्यासाठी शब्दशक्ती वापरावयाची ते संज्ञापन-ज्ञान नसते. त्यामुळे उत्तम वक्त्याच्या ठायी ज्ञान आणि शब्दशक्ती यांचे संज्ञापनकौशल्य आवश्यक असते. ग्रंथाचा उदय होण्यापूर्वी वक्तृत्वाने फिरती ज्ञानपोई चालविली. समाजाच्या सर्व स्तरांना साहित्याची गोडी लावण्याचे काम वक्तृत्वाच्या माध्यमातून कीर्तनसंस्थेने केले.



आपल्याकडे अक्षरसाहित्य निर्माण करणाऱ्यांनाच साहित्यिक म्हणून मान्यता लाभते. वाचिक आणि लिखित असे साहित्याचे दोन प्रकार आहेत. एक वाणीतून निर्माण होणारे आणि दुसरे लेखणीतून साकारणारे. कै. काकासाहेब गाडगीळ म्हणत, 'अरण्यात दोन माणसे एकमेकांना भेटली तर ती प्रथम एकमेकांशी बोलतील.' इतके बोलणे स्वाभाविक आहे. बोलणे हे साहित्याचे प्रारंभिक रूप आहे. आरंभीचे बहुतांशी साहित्य खऱ्या अर्थाने वाङ्मयच होते. लेखकाला जेव्हा एखादी कल्पना सुचते, तेव्हा प्रथम तो मनातल्या मनात संवाद करतो, नंतर तिला अक्षररूप प्राप्त होते. 'ऐसी अक्षरे रसिके । मेळवीन' अशी प्रज्ञा असणाऱ्या ज्ञानेश्वरांनीदेखील साहित्याचे पहिले रूप प्रधान मानले. महाराष्ट्राचे समाजमानस घडविण्याचे काम अनेक वक्त्यांनी केले, त्यांपैकी किती जणांना साहित्य संमेलनाध्यक्षपदाचा मान मिळाला? केवळ प्राचार्य राम शेवाळकरांच्या वाट्याला हा सन्मान आला. शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे, प्राचार्य शिवाजीराव भोसले, डॉ. निर्मलकुमार फडकुले यांना हा सन्मान का देण्यात आला नाही?

साहित्यिकांच्या हातून लेखन होणे, त्याचे प्रकाशन होणे, ते साहित्य वाचकांपर्यंत पोहोचणे, त्याचे चिंतन होणे; आणि त्याचा काय संस्कार व्हायचा तो होणे ही प्रक्रिया तशी जटिल आहे. एखादा विषय समजून घेण्यासाठी अनेक विषयांवरची पुस्तके वाचावी लागतात. पण त्याऐवजी अभ्यासपूर्ण प्रतिपादन करणाऱ्या एखाद्या उत्तम वक्त्याचे भाषण ऐकले तर तो विषय उत्तम रीतीने समजू शकतो. समाजजागरणात आणि प्रबोधनकार्यात वक्तृत्वाचे अनन्यसाधारण असे महत्त्व आहे. अक्षरओळख नसणारे सर्वजण केवळ वाणीतून प्रकटणाऱ्या साहित्याचाच आस्वाद घेऊ शकतात; हेच वाचिक साहित्याचे थोरपण आहे. म्हणूनच प्राचार्य शिवाजीराव भोसले अक्षरओळख नसणाऱ्या साहित्यप्रेमींचे आधार होते. त्यांच्यात साहित्याविषयीची, भाषेविषयीची आणि शब्दांबद्दलची आवड निर्माण करण्याचे काम प्राचार्यांनी केले.

एखाद्या सुसज्ज, बंदिस्त, वातानुकूलित आणि सर्व सोयींनी युक्त खोलीत बसून समाजाच्या प्रश्नांची साहित्यिक चर्चा करणे वेगळे; आणि उभा समाज उघड्या डोळ्यांनी पाहणे वेगळे. तो पाहण्यासाठी भ्रमंती करावी लागते. लोकांशी संवाद साधावा लागतो. वक्तृत्वात एकेक गाव जिंकत जावे लागते, ही गोष्ट वाटते तेवढी सोपी नाही म्हणूनच वक्त्यांचे महत्त्व आहे. स्वातंत्र्याचा लढा असो, संयुक्त महाराष्ट्राचा लढा असो, कोणत्याही क्षेत्रातली कोणतीही चळवळ असो, राजकारण असो, जिथे संवाद येतो, तिथे अटळपणे वक्तृत्व येते. शिकागोचे सर्वधर्मसंमेलन भरले नसते तर जगाला विवेकानंद दिसले असते का? व्यासपीठ या नावाचा प्रकार अस्तित्वात नसता तर टिळक, गांधी, नेहरू, डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन्, जे. कृष्णमूर्ती, सावरकर, बाळशास्त्री हरदास, संत गाडगेबाबा आणि तुकडोजी महाराज, आचार्य अत्रे, विष्णुजी क्षीरसागर, क्रांतिसिंह नाना पाटील, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, श्री. म. माटे, ना. सी. फडके, शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे, डॉ. निर्मलकुमार फडकुले या माणसांची ओळख पटली असती का? 'जेव्हा व्यासपीठ हे समाजाचे हृदय होते, तेव्हाच विचारांचे आणि भावभावनांचे अभिसरण घडते', असं प्राचार्य म्हणत. त्यामुळे लेखकांनी वाणीचा आणि वक्त्यांनी लेखणीचा द्वेष करू नये. ही दोन्ही शब्दशक्तींची रूपे आहेत. त्यांना साहित्यसंस्कृतीच्या देव्हाऱ्यात समान स्थान द्यावे.

प्राचार्यांनी वक्तृत्वाची साधी, सोपी, सरळ व्याख्या केली. ते म्हणत, "ज्यांचे बोलणे ऐकत राहावे असे ऐकणाऱ्याला वाटते, तेव्हाच बोलणाऱ्याच्या बोलण्यातून आविर्भूत होणारे, आविष्कृत होणारे ते वक्तृत्व!" शब्द हे वक्तृत्वाचे शरीर, विचार हा आत्मा आणि वक्तृत्वातून पाझरणारे नानाविध रस ही वक्तृत्वाची आभूषणे असतात. अभिनिवेशपूर्ण बोलणे म्हणजे वक्तृत्व नव्हे. हातवारे करीत अभिनयाचा आधार घेत प्रतिपादन करणे म्हणजेही वक्तृत्व नव्हे. शब्दशक्तीचा अनिर्बंध वापर म्हणजे वक्तृत्व नव्हे. शब्दशक्तीचे गर्वयुक्त प्रदर्शन करण्यापेक्षा वक्त्यांनी आपली ज्ञानशक्ती नम्रतेने प्रकट केली, तर अशा ज्ञानशक्तीपुढे श्रोते आदराने नतमस्तक होतात. 'वक्ता निरभिमान भेटे । तेणे श्रोतयाचा संशय तुटे । उभये अभिमान विटे । प्रांजळ निरूण ।' यातच वक्तृत्वाचा खरा आनंद आहे. त्यातूनच वक्तृत्वाला अभिप्रेत असणारे काम होणार आहे. गोमांतक कवी सोहिरोबा आंबिये म्हणत, 'विवेकाची ठरेल ओल । जे बोलायचे ते ऐसे बोल । आपुले मते उगीच चिखल । कालवू नको रे ॥' वक्तृत्वात उत्स्फूर्ततेचा भाग कमी असतो. उत्तम तयारी आणि उत्स्फूर्तता यांतूनच अशरीरी वक्तृत्वशिल्प आकाराला येते. व्यासपीठावरून व्याख्यान देण्यापूर्वी वक्त्याने ते अनेकदा मनाच्या व्यासपीठावरून दिलेले असेल; तर ते व्याख्यान अधिक रंगते. जाणकार प्रगल्भ श्रोताच वक्त्याला फुलवीत असतो.

लेखन दीर्घकाळ टिकते आणि वक्त्याचे शब्द वाऱ्यावर विरून जातात; असे काही जणांना वाटते. लेखक आपले शब्द कागदावर उमटवतो. वक्ता





अनुक्रमणिका

आपले शब्द श्रोत्यांच्या अंत:करणावर उमटवतो. कागदावरचे शब्द कालांतराने पुसले जाऊ शकतात, पण संस्कार कायम राहतो. वक्तृत्वाचे तसेच आहे. सभा संपते, शब्द विरून जातात, पण विचार श्रोत्यांच्या मनाच्या गाभाऱ्यात कायमची दिवेलागण करून जातात.

न्या. महादेव गोविंद रानडेंनी १८७१ मध्ये स्थापन केलेल्या पुण्यातील वक्तृत्वोत्तेजक सभा या संस्थेने सव्वाशे वर्षांपेक्षा अधिक काळ वसंत व्याख्यानमाला आयोजित करून श्रोत्यांच्या मनात विचारांचा वसंत फुलवला. सलग २८ वर्षे पुण्याच्या या वसंत व्याख्यानमालेत व्याख्याने देऊन प्राचार्यांनी व्याख्यानमालेच्या इतिहासात एक विक्रम नोंदवला. ही वसंत व्याख्यानमाला महाराष्ट्रातल्या आपल्या शाखोपशाखांतून पसरत राहिली. या व्याख्यानमालांनी अनेक दिग्गज वक्ते घडविले. तसेच चोखंदळ, जाणकार श्रोतेही घडविले.

शिक्षणाचा प्रसार वाढत गेला. संगणक, मोबाईल, इंटरनेट, फेसबुक, ट्यूटर यांसारखी संवादाची माध्यमे उपलब्ध झाली, तशी श्रोत्यांची संख्या ओसरू लागली. माहितीच्या महाजालामुळे माहिती मोठ्या प्रमाणात उपलब्ध झाली. जीवनाचे झालेले शहरीकरण, काटेकोर झालेले वेळापत्रक, सभास्थानांची वाढत गेलेली अंतरे, यामुळे केवळ ज्ञानसंपादनासाठी सभास्थानी जाऊन श्रोत्यांची भूमिका बजावण्यात लोकांना स्वारस्य उरले नाही. हे चित्र शहरी भागात दिसते. ग्रामीण भागात अजूनही व्याख्यानमालांचे वैभव टिकून आहे. अगदी ई-लर्निंगसारख्या संकल्पना अस्तित्वात आल्या, तरी वर्गातल्या शिक्षकाचे महत्त्व कमी झाले नाही. तसेच संवादाची कितीतरी माध्यमे वाढली तरी अभ्यासू वक्त्याच्या वक्तृत्वातून मिळणाऱ्या श्रवणानंदाचे महत्त्व कमी होणार नाही. माहितीचा कितीही विस्फोट झाला तरी माहिती म्हणजे ज्ञान नव्हे. ज्ञानाचे क्षेत्र अबाधितच राहणार आहे. वाचन, मनन, चिंतन आणि अनुभव यांना सोबत घेऊन वक्तृत्वातून प्रकटणारे ज्ञान ही नव्या युगाची मागणी असणारच आहे.

एकान्त ही वक्तृत्वाची उत्थानभूमी आहे, असं प्राचार्य म्हणत. एकान्त आणि एकाग्रता ही मूल्ये आहेत, असे ते मानत. 'जयाशी एकान्त मानवला। सर्व काही सुचे त्याला ॥' या समर्थ वचनावर त्यांची अढळ श्रद्धा होती. व्याख्यानाच्या भरात झालेल्या शाब्दिक आणि वैचारिक प्रमादाचे चिंतन करण्यासाठी एकान्त आवश्यक आहे असे ते मानत. त्यामुळे ते व्याख्यानानंतर शब्दमुक्ती आणि एकान्त अनुभवत. श्रवण आणि मनन, वाचन आणि चिंतन यांना एकान्ताचे कोंदण लाभले, तर वक्तृत्व झळाळून निघते. पण आजच्या धावपळीच्या जीवनशैलीत हा एकान्त वक्त्यांच्या वाट्याला येणे अवघड झाले आहे. त्यामुळे चिंतनशील वक्तृत्वाची मोठी हानी होत आहे. एकाच विषयाला कवटाळून गावोगावचे उंबरे झिजवणारे वक्ते उदंड झाले आहेत. 'अभ्यासोनि प्रकट व्हावे । नाहीतरी झाकोन असावे ।' हा समर्थांचा आदेश आज पाळला जात नाही. निर्भयपणे प्रतिपादन करण्यासाठीचे निकोप वातावरण आज राहिले नाही. आंतरविद्याशाखीय अभ्यासाच्या माध्यमातून वक्तृत्वाचे भरणपोषण करण्याची आणि त्यासाठीचे कष्ट उपसण्याची वक्त्यांची तयारी राहिली नाही. प्राचार्य म्हणत, "वक्त्याच्या जीवनातून वक्तृत्व वजा केल्यानंतर जेव्हा बरेच काही उरते तोच खरा वक्ता." वक्तृत्व ही केवळ शब्दांची आतषबाजी नसते. ती जीवनाची उपासना असते.

आजच्या समाजातले सर्व विषय भावनिक आणि अकारण संवेदनशील झाले आहेत. त्यामुळे तर्कशुद्ध विवेचनाला अर्थ उरला नाही. 'सत्य असत्याशी मन केले ग्वाही । मानियले नाही बहुमता ॥' या तुकोबांच्या वचनाला अंगी बाणवण्याचे सामर्थ्य फार कमी वक्त्यांत उरले आहे. कोणत्या गोष्टीमुळे समाजाच्या भावना दुखावल्या जातील ते सांगता येत नाही. ज्ञानाच्या क्षेत्राला व्यक्ती आणि विचार विद्वेषाच्या ग्रहणाने ग्रासले आहे. वैचारिक क्षेत्रात वक्तृत्वाची ही अवस्था, तर राजकारणात अर्थहीन उदंड वक्तृत्व रान माजवते



अनुक्रमणिका

आहे. एकेकाळी देशाचे आणि समाजाचे नेतृत्व करणारे सगळे नेते उत्तम साहित्यिक, विचारवंत, तत्त्वज्ञ होते. त्यांची वाणी समाजाला आणि देशाला दिशा दाखविण्याचे काम करायची. आज तो वाग्विलास उरला नाही. या प्रतिकूल परिस्थितीतही निष्ठेने वक्तृत्वसाधना करणारी काही अपवादभूत माणसे आहेत. त्यांच्या जीवावर वाग्वैजयंती तरली आहे.

व्यासपीठावरील चिंतनशील वक्तृत्वाची पीछेहाट होत असली; तरी बोलण्याचे आणि नेटक्या बोलण्याचे महत्त्व कदापि कमी होणार नाही. उलट ते वाढतेच आहे. संवाद, मुलाखती, परिसंवाद, चर्चासत्रे, निवेदन अशा अनेक रूपांत, भरजरी थाटात ते वावरते आहे. उत्तम बोलता येणाऱ्यांचे हे दिवस आहेत. गुजगोष्टी करण्यापासून ते कार्पोरेट जगतात उच्चरवात आपली भूमिका मांडण्यापर्यंत प्रत्येक छोट्या गोष्टीशी बोलणे निगडित आहे. परदेशात वक्ते भाषण लिहून काढतात आणि नंतर त्याला वक्तृत्वरूप प्राप्त होते. भारतात माणसे अगोदर बोलतात, नंतर त्यांच्या बोलण्याला अक्षरत्व प्राप्त होते. पंतप्रधान, राष्ट्रपती यांची भाषणे लिखित असतात. शब्दाचा आणि वेळेचा अपव्यय टाळणे, नेमकेपणाने काय म्हणायचे ते सांगणे, हाच त्यामागचा उद्देश आहे. 'सर्व धर्म ब्रह्मासच मिळती । जशा सागराला सरिता।' या न्यायाने हा सारा शब्दोत्सव शेवटी वैखरीच्या गाभाऱ्यात स्थिरावतो. बोलणे हा केवळ जगाच्या व्यवहारातील उपचाराचा भाग राहात नाही. बोलण्यातून भाषा, साहित्य, संस्कृती, समीक्षा यांचे आणि पर्यायाने त्या समाजाचे उन्नयन होत असते. म्हणूनच वाग्देवतेची विधिवत् पूजा करण्याची संस्कृती विकसित झाली पाहिजे.

वाचिक अभिव्यक्तीचा गांभीर्याने अभ्यास करण्यासाठी महाविद्यालये, विद्यापीठे, साहित्य संस्थांनी महत्त्वाची पावले उचलली पाहिजेत. असे घडले तरच देशाला आणि समाजाला विचारवाटा दाखविणाऱ्या वक्त्यांचे आणि त्यांच्या वाग्वैभवाचे आम्ही स्मरण ठेवतो, असे म्हणण्याचा अधिकार आपल्याला आहे.

◇◇◇

**प्रा. मिलिंद जोशी**
बी/१/१२, रविराज टेरेस, सुखसागरनगर, कात्रज,
पुणे ४६. फोन (०२०) २६९६३५०९/
मोबा. ९८५०२७००८२३












# विद्याधर पुंडलीक यांच्या कथेतील जन्म-मृत्यूच्या गूढाचा वेध

- डॉ. विद्यागौरी टिळक

*[जन्म-मृत्यूचे अनाकलनीय रहस्य जेव्हा कथाविषय होते; तेव्हा अभिव्यक्तीची कसोटी असते. जन्म-मरणाच्या कल्पनेचे अनेक तर्कसंमत आणि तर्कदुष्ट आविष्कार कथेच्या रूपात प्रकट करताना एक अनोखी जीवनसंहिता विद्याधर पुंडलिकांच्या कथाविश्वात अनुभवायला मिळते. मृत्यूची अनपेक्षित दर्शने, त्याचे पूर्वसंचिताशी जोडलेले नाते, त्याच्या बलाढ्य रूपासमोरील मानवाचे दुबळेपण, मृत्यूलाही लाजविणारे मानवी बळ, त्याचा काव्यात्म न्याय, चिरशांतीसाठी आणि ह्या जन्मातील अपुरेपण भरून काढण्यासाठी पुनर्जन्म कल्पनेने केलेले त्याचे स्वागत, तर कधी श्रेयस्-प्रेयसाची चुकामूक... एक ना अनेक ,संकल्पनांशी जोडलेले मानवी नातेसंबंधाचे चिंतन करू पाहणाऱ्या कथेच्या ह्या अनवट रचनाबंधाची ही समीक्षा. –संपादक]*

विद्याधर पुंडलीक हे मराठी कथेच्या क्षेत्रातील एक महत्त्वाचे नाव आहे. इ.स. १९४५ नंतर नवकथेचा टप्पा मराठी वाङ्मयामध्ये आला. गंगाधर गाडगीळ आणि अन्य कथाकारांनी आणलेली नवकथेची वैशिष्ट्ये स्वीकारणारे आणि तरीही त्यांना आपापल्या पद्धतीने स्वतंत्रपणे वळण देणारे जे कथाकार नंतर दिसतात, त्यामध्ये एका वेगळ्या प्रकृतिने पुंडलिकांची कथा लक्ष वेधून घेते. नवकथांमध्ये व्यक्तिरेखाटन, कथानक या घटकांचे महत्त्व झुगारून आशय व आविष्काराचे विविध प्रयोग झालेले दिसतात. पुंडलिकांच्या कथांमध्ये कथानकाला, घटनाप्रसंगांच्या गुंफणीला, व्यक्तिरेखाटनाला महत्त्व आहे, पण तरीही ती घटनाप्रधान वा व्यक्तिप्रधान कथा नाही. त्या पलीकडचा सूचितार्थ कवेत आणणे हे साहित्याचे प्रयोजन आहे, ही नवकथेतील जाणीव तिने उचलली आहे; आणि त्यासाठी आपापल्या पद्धतीने स्वातंत्र्य घेतले पाहिजे, हा मोकळेपणाही स्वीकारला आहे. एका अर्थी नवकथा पचवून वेगवेगळ्या मार्गांनी मराठी कथेला पुढे नेणाऱ्यांपैकी पुंडलीक एक कथाकार आहेत.

त्यांचे कथालेखन विपुल म्हणावे असे नाही. 'पोपटी चौकट' (१९६२), 'टेकडीवरचे पीस' (१९६९), 'देवचाफा' (१९७९), 'माळ' (१९८०), 'फॅन्टासिया' (१९९४) या पाच संग्रहांमध्ये मिळून त्यांच्या एकूण ४६ कथा प्रकाशित झालेल्या आहेत. 'वेचक पुंडलीक' या निवडक कथांच्या संग्रहात यातीलच १२ कथा समाविष्ट आहेत. याशिवाय संग्रहात न आलेल्या काही कथा आहेत, पण त्यांची संख्या फारशी नसावी.

तुलनेने मोजक्या अशा या कथा असल्या, तरी त्यांनी समीक्षकांचे लक्ष वेधून घेतलेले दिसते. अनेकदा आविष्कारातील प्रयोगशीलता, नवनव्या तंत्रांची हाताळणी हे साहित्यकृतीच्या लक्षवेधकतेचे एक कारण असते. पुंडलिकांची कथा मात्र अशा प्रयोगशीलतेपासून दूर आहे. त्यांचे बळ हे जीवनाच्या चिंतनशील वृत्तीने घेतलेल्या शोधात आणि त्याच्या रेखीव, परिपूर्णतेकडे जाणाऱ्या आविष्कारांमध्ये आहे. आपल्याला जाणवणारी अनुभवाकृती तिच्यातील सर्व शक्यतांसह व्यक्त करण्यासाठी आवश्यक ते निवेदनाचे सर्व घटक ते उपयोगात आणतात. मात्र मुद्दाम केलेले प्रयोग वा नव्या घाटांचा शोध त्यात दिसत नाही.

पुंडलिकांच्या कथांमधून काही आशयप्रदेश वारंवार आविष्कृत होत राहतात. माणसाला विविध



अनुक्रमणिका

तऱ्हांनी भेटणारा मृत्यू, या सर्वव्यापी व सर्वभक्षी काळासमोरच्या व्यक्तींच्या निरनिराळ्या प्रतिक्रिया, त्यामध्ये त्यांनी घेतलेला आपापल्या श्रेयसाचा (वा प्रेयसाचाही) शोध, या दोन्हींचाही नातेसंबंधांवर होणारा परिणाम, त्यांचे जुळणे वा विस्कटणे त्यांच्या कथांमधून भेटत राहाते. त्याचप्रमाणे या गुंतागुंतीपासून बव्हंशी अलिप्त असणारे वा तिची ओळख करून घेत असलेले बालांचे विश्वही येते. काही वेळा अनुभवांचे हे धागे स्वतंत्र कथांचा विषय झाले आहेत, तर काही वेळा एकत्र गुंफण होऊन त्यात व्यामिश्रताही आली आहे.

मृत्यूची गूढता, अतर्क्यता हे पुंडलिकांच्या कथांमधले एक ठळक सूत्र आहे, हे अनेकांनी सांगितलेले आहे. (त्याचा चरित्रात्मक वा अन्य पद्धतींनी शोध शक्य असला, तरी तो इथे प्रस्तुत नाही.) मात्र त्यांच्या बहुतांश कथांमधून मृत्यू एकटा न येता नवा जन्म वा निरागस बाल्य यांना जोडून आलेला दिसतो. हा संबंध विविध प्रकारांनी जोडला गेला आहे. जीवन आणि मृत्यूचे नाते! हे नाते पुंडलिकांच्या अनेक कथांमध्ये आहे. ते तसे का आहे, हे विचार करण्याजोगे आहे.

पुंडलीक कथा लिहीत आहेत, त्या काळात संवाद-विरोध-लयाची परिभाषा प्रचारात आहे. त्या तऱ्हेने अनुभवाकडे पाहणेही घडते आहे का? लेखकाच्या दृष्टिकोनावर अशा व्यूहांचा प्रभाव कितपत पडत असतो? दुसरे म्हणजे, मृत्यूतले कारुण्य, शोकात्मता, गूढता अशा संदर्भांमध्ये अधिक गडद होत जाते. पुंडलिकांचा संवेदनस्वभाव लक्षात घेता अशा अनुभवांभोवती त्यांचे मन रुंजी घालत राहावे, त्यातील कथेचा शोध घेत राहावे, हे स्वाभाविक वाटते. तिसरी शक्यता अशी जाणवते की, भारतीय परंपरा जन्म आणि मृत्यू वेगळे न पाहता त्यांची साखळी कल्पिते. त्यांच्याशी अदृष्टाचे, कर्माच्या गतीचे नाते जोडते. मृत्यूच्या गूढाचा शोध घेताना पुंडलीक सहजपणे त्या वाटेकडे वळतात का?

पुंडलिकांच्या वाङ्मयीन प्रकृतिचा विचार करता नंतरची दोन कारणे अधिक प्रस्तुत वाटतात.

या अनुभवांशी संबंधित कथा त्या दृष्टीने पाहण्याजोग्या आहेत. 'मी येऊ?', 'गाय', 'वॉर्ड नं. सात', या कथांमधील मुलांपुढे मृत्यू येऊन ठाकतो आहे. त्यांचे विश्व उलटेपालटे करून टाकतो आहे. 'मी येऊ?' मधला अवी मांजरीला कधी पिल्ले होणार याची उत्सुकतेने वाट बघतो आहे. आपल्या आईबापांना तिच्यासाठी काहीबाही करायला सांगतो आहे. पण मांजर आपले पिल्लू खाते असे कुणीतरी सांगितल्यावर तो हादरून जातो. तिला घाबरू लागतो. मांजरीने आपले पिल्लू खाण्याची कल्पना त्याच्या दृष्टीने इतकी धक्कादायक आहे की, त्याचा आईबापांवरचा विश्वासही डळमळीत होतो. सारेच संशयास्पद, भीतिदायक बनून जाते. इतके की, एक निरागस, हळवा मुलगा आपल्या काही दिवसांपूर्वीपर्यंत लाडक्या असणाऱ्या मांजरीला विहिरीत टाकून देण्याएवढा हिंस्र होतो.

'वॉर्ड नं. सात' मधील विनूपुढे शेजारच्या कॉटवरच्या म्हाताऱ्याचे मरण भीतिदायक बनून येते आहे. त्याला आधार देता देता नानांचे स्वत:चे भय संपते; आणि ते मृत्यूला तयार होतात. मात्र काळ त्यांच्याऐवजी विनूलाच घेऊन गेल्यावर त्यांना जिवंत राहिल्याबद्दलचे अपराधीपण खात राहाते. 'गाय'मधल्या केशवलाही आजीच्या मृत्यूला एकटेच सामोरे जावे लागते.

या कथांमधल्या बालांच्या व्यक्तिरेखा पाहताना, जीवनातल्या निरागसतेवर होणारे काळाचे आघात पुंडलीक व्यक्त करीत आहेत असे जाणवते. मात्र तेवढाच त्यांचा आशय नाही. प्रत्येक कथा अर्थाची वेगवेगळी वलये घेऊन येते आहे.



अनुक्रमणिका

'वॉर्ड नं. सात'मधले नाना आणि 'गाय'मधली केशवची आजी या दोघांनीही कमीअधिक प्रमाणात पुनर्जन्माची कल्पना, त्यामागचे अदृष्टाचे धागे इ. कल्पना स्वीकारलेल्या आहेत. नानांचे स्वत:चे भय, मरण पावलेल्या त्या म्हाताऱ्याला आता कुठेतरी नवा जन्म मिळत असेल, असे सांगता सांगता संपत जाते आहे. आपल्या अखेरीची तयारी करता करता नव्या जन्माच्या कल्पनेने जगाशी त्यांचे नाते पुन्हा जोडले जाते आहे. विनूमुळे ते अधिक जिवंत होते आहे. या पार्श्वभूमीवर कथेची अखेर जन्ममृत्यूच्या फेऱ्याची अतर्क्यता अधोरेखित करत गडद परिणाम साधते. हे करीत असताना विनूच्या बाल्याच्या टवटवीत रंगांनी त्याला कसा उठाव दिलेला आहे, हेही पाहण्याजोगे आहे.

प्रत्येक कथेतल्या मृत्यूचा परिणाम असा गडद, शोकात्म आहे, असे नाही. 'गाय'मधला केशव आजीच्या अनपेक्षित अंताने हादरला असला, तरी एकूण कथेची मांडणी पाहता तो अनपेक्षित नाही. या कथेत मानवी आयुष्याची सांगड सृष्टिचक्राशी घातलेली आहे. पाणी पुरेसं नसताना उन्हाळ्यात गळून जाणारी वडाची पानं शहाणी असतात, असं आजी म्हणते. 'पावसाचं पाणी – आकाश – वडपिंपळ – तिची गेलेली मुलं – अंधार' या सगळ्यांमध्ये तिला एक अदृश्य साखळी जाणवते आहे. आजी ही शृंखला समजून घेऊन स्वीकारणारी आहे. तिला जणू ते रहस्य उलगडले आहे. आजोबांचे तिच्या कथनातून उभे राहणारे चित्र मात्र याला पूर्णपणे विरोधी आहे. लालभडक पुराशी झुंज देताना त्यांच्या मनात काळाशीच झुंज देण्याची ईर्षा आहे. पाच कोवळ्या मुलांचा मृत्यू हेही त्यांच्या त्या ईर्ष्येचे एक कारण आहे. केशवच्या मनातही ती ईर्षा जागी होते आहे. किशोरवयीन केशवच्या नजरेतून उभ्या राहिलेल्या या कथेतली आजी पावसाची वाट पाहते आहे. आकाशाची पाणमोटळी फुटण्याची तिच्या बोलण्यात येणारी प्रतिमा, पावसाच्या आरंभी पिंपळाखाली येणाऱ्या गायीसाठी तिची चाललेली प्रतीक्षा, शेवटी पावसात अडकलेला केशव घरी आल्यावर त्याला गाय दिसणे आणि आजी अचेतन होऊन पडलेली आढळणे या साऱ्यांमधून एक संगती साधली जाते. आजीने शेवटी पाऊस पाहिला की नाही, असा प्रश्न केशवला विद्ध करीत असला, तरी पावसाचे येणे आणि तिची अखेर यातील अनुबंध अन्य घटकांमधून सूचित होतो आहे.

या आशयक्षेत्राशी संबंधित या दोन कथा अधिक खोलवर जाणाऱ्या का वाटतात, हाही एक विचार करण्याजोगा प्रश्न आहे. केवळ व्यक्तींच्या प्रतिक्रिया, त्यांचे परस्परसंबंध यावर न थांबता त्या जन्म-मृत्यूमागच्या गूढत्वाचा शोध घेऊ पाहतात म्हणून? की परंपरेशी जुळलेल्या धाग्यांमुळे पुंडलिकांना तिथे अधिक मुक्तपणे खोलवर वेध घेणे शक्य होते?

'एका मांजरीची कथा' मध्ये कृष्णाबाई आपलं एकही पोर का वाचलं नाही ही खंत करत जीवनविन्मुख बनलेल्या आहेत, तर गोपाळरावांना गेलेल्या माणसांनी जगत्या जिवांवर इतकी सत्ता गाजवावी हेच रुचत नाही. गोपाळरावांचा त्यांचे मन रमवण्याचा प्रयत्न वारंवार अयशस्वी होतो आहे. अशात आपल्याला कॅन्सर असल्याचे त्यांना कळते. आपण पचवलेल्या मृत्यूंमुळे आपली भीती गेलेली आहे, असे समजणारे गोपाळराव 'आपल्या मांजरीची पिल्लं तरी वांचतील ना?' या कृष्णाबाईंच्या हतबल प्रश्नाने मात्र ढासळतात. अर्थसघन अनुभव देणारी ही कथा परंपरेशी काही अंशी बांधलेली आहे. कृष्णाबाईंच्या प्रश्नामधून संचिताविषयीची धारणा व्यक्त होते. गोपाळराव मात्र त्याला छेद देऊ पाहत आहेत.

'डोळे' आणि 'ठिपका' यांमध्येही जन्म/बाल्य

व मृत्यूची ही सांगड आहेच; परंतु त्यांच्यामध्ये मुख्य रोख हा प्रौढांचा दृष्टिकोनामध्ये होणाऱ्या स्थित्यंतरावर आहे. 'ऐलतीर'मध्ये बापूंच्या मृत्यूनंतरच्या घटनांमधून मनुष्यस्वभावाच्या वेगवेगळ्या परी, नातेसंबंधांची गुंतागुंत उभी राहाते. पण तेथेही बापूंच्या सुनेला-शालिनीला-अपत्यसंभवाची चाहूल लागल्याचा उल्लेख येतो. 'प्रवास'मध्ये ही सांगड अगदीच अनपेक्षित रीतीने येते. क्रांतीसाठी हिंसाचाराचा मार्ग स्वीकारणारा तो प्रवासात एका अनोळखी तरुणीला प्रसूतीसाठी सहाय्य करतो. मनुष्यजन्माचा अनुभव त्याच्या मनात एक कोवळीक जागी करतो. पण ती मनुष्यजातीच्या भल्यासाठी आपण स्वीकारलेला मार्ग योग्य आहे, यावरची त्याची निष्ठा प्रखर बनवते आणि त्याला योजनेवरहुकूम मनुष्यहत्या करायला पुढेच रेटते.

पुंडलिकांनी मृत्यूचे जीवनावर होणारे आघात अनेक रूपांनी आविष्कृत केलेले दिसतात. त्याचबरोबर या नश्वरतेला तोंड देण्यासाठी वेगवेगळ्या वाटांचा शोधही माणसे घेत असतात. आपापले श्रेय शोधण्यासाठी त्यांची चाललेली धडपड, त्या श्रेयसाच्या शोधात त्यांचे थकणे, गोंधळणे, कधी श्रेयसप्रेयसाचा संघर्ष, कधी त्यामधून दुरावत गेलेले नातेसंबंध, आपले बळ कमी पडल्याची जाणीव असे विविध अनुभवही अनेक कथांमधून त्यांनी आविष्कृत केलेले आहेत.

'यमू, टिळक आणि आगरकर' या कथेमध्ये काळाशी झुंज देत राहण्याबद्दलचा चिंतनशीलतेतून आलेला अनुभव व्यक्त होतो. हरिभाऊंच्या यमूच्या हस्तलिखिताची आणखी काही पाने सापडतात आणि त्यातून यमूचे या दोन ऐतिहासिक महापुरुषांशी किंचित्काळ जुळून गेलेले नाते उजेडात येते, अशा रीतीने ही कथा उलगडलेली आहे. आपलं चरित्र हाच पोटचा गोळा मानून त्याच्याकडे पाहा, असं तिला आगरकर सांगतात, तर जगायची वासना झिजेल असं वर्तन करणं हा देवाशी द्रोह आहे, असं टिळक वजावून जातात. यमूच्या मनाचे समाधान त्यांच्या बोलण्याने झालेले नाही. तिची तडफड कायम आहे. मात्र ऐतिहासिक वास्तव व एका विशिष्ट अनुभवाची व शैलीची चौकट यामुळे तिच्या अर्थसूचनांच्या क्षमता मर्यादित झालेल्या दिसतात. पुंडलीक जीवनाचा कशा पद्धतीने विचार करू पाहतात, त्याची एक दिशा मात्र या कथेतून जाणवते.

प्रत्येकाला आयुष्यात सापडणारे, गाठावेसे वाटणारे श्रेयस वेगळे असते, याची जाणीव पुंडलिकांच्या मनात पक्की आहे. त्यामुळे त्याच्या शोधाच्या वेगवेगळ्या परी आणि त्यातील यशापयश विविध कथांमधून उलगडत जाते. 'प्रवास', 'वाटा' तसेच 'वेडीवाकडी लाल रेषा' यांसारख्या कथा या दृष्टीने पाहण्यासारख्या आहेत.

मृत्यू आणि या श्रेयसाची प्राप्ती यांचा परस्परसंबंधही काही कथांमधून जुळलेला दिसतो. 'बोलावणं' मधला किसन लौकिकदृष्ट्या अपयशी म्हणावा असा असला, तरी गोव्याच्या सत्याग्रही तुकडीचे बळ टिकवून ठेवायचे काम त्याने जाता जाता केले आहे. 'जगण्याची शरीराला लागलेली सवय सहजपणे विसरायची', असे म्हणत म्हणत त्याने त्याक्षणी ती उडी घेऊन दाखवली आहे. सर्वसामान्य वाटणाऱ्या माणसाच्या व्यक्तिमत्त्वातली ही अज्ञात बाजू त्याच्या पत्नीला नंतर कळते, असे दाखवून पुंडलीक येथे मानवी व्यक्तिमत्त्वातील अनाकलनीयता, असाधारणताही सूचित करतात. त्याची पत्नी वत्सला हिचे व्यक्तिमत्त्वही पुंडलिकांनी फार कौशल्याने उभे केले आहे. तिच्या दृष्टीने किसनचे हौतात्म्य हे प्रापंचिक जबाबदाऱ्यांपासून दूर पळणे आहे. त्याने पत्करलेल्या मार्गाबद्दल तिच्या मनात चीड आहे, नवऱ्याबद्दलचे प्रेमही आहे आणि





अनुक्रमणिका

घरात झालेल्या भांडणामुळे त्याने हा पर्याय स्वीकारला अशा समजुतीने आलेले अपराधीपणही आहे. तिचे आपली ओळख लपवत तिथे गुन्हेगारासारखे येणे हे अन्वर्थक आहे.

'त्याला मिळाला वनमाळी' या कथेतल्या शिवरामबुवांनाही मृत्यूनेच ते श्रेय गाठायचे आहे. भक्तीची सर्वोच्च पायरी आत्मसमर्पण, असे मानणारे बुवा डॉक्टरांनी मनाई केलेली असूनही हेतूपुरस्सर कीर्तनाला उभे राहतात. एकीकडे रंग जमवता जमवता उभे आयुष्य त्यांच्यापुढून फिरून जाते. तिघा मुलांच्या तीन तऱ्हा, त्यांच्या स्वत:च्या जीवनमार्गाशी त्यांचा असलेला विसंवाद त्यांना पुन:पुन्हा जाणवत राहातो. अध्यात्माचा उपदेश करता करता, लोकांना जिंकून घेणारी अंगे त्यात मिसळता मिसळता बुवांची अस्वस्थता वाढत जाते. कोसळण्यापूर्वी त्यांना जाणवते ते ईश्वराचे 'ठकविणारे' रूप. मीरेच्या पदातली 'ठगौरी' म्हणजे काय, याचा अन्वयार्थ शोधीत असतानाच – किंबहुना आपल्या समजुतीच्या अगदी विपरीत तो आहे असे जाणवू लागताच- तोवर आपले अवसान राखून कीर्तन करणाऱ्या बुवांना झटका येतो. मात्र त्यांना अपेक्षित असा तो शांत, उदात्त क्षण नाही. तोपर्यंत आत्यंतिक श्रद्धेने वाटचाल करीत असलेल्या त्या जीवाला त्याक्षणी आशंकेचा डंख झालेला आहे. आपल्या हाती यावेसे वाटत असलेले काहीतरी बहुधा दूरच गेलेले आहे.

कीर्तनाची शैली, परंपरेतील विविध संदर्भ, एकीकडे लोकांशी तर दुसरीकडे स्वत:शी आणि ईश्वराशीही चाललेला बुवांचा संवाद या कथेमधून पुंडलिकांनी फार समर्थपणे उभा केला आहे. पण त्याचबरोबर विपरीत प्रापंचिक परिस्थितीतून जाता जाता बुवांच्या मनात आलेला संभ्रमही परिणामकारकपणे पारंपरिक चौकटीच्या दडपणाखाली न जाता सूचित केला आहे. कीर्तनातील घटक आणि बुवांच्या समोर उभे राहणारे त्यांचे आयुष्य, त्यांच्या मनातील उलघाल हे सारे व्यक्त करीत असताना निवेदनाची एक विलक्षण परिणामकारक लयही पुंडलिकांनी साधलेली आहे.

परंपरेतील धाग्यांचा कथा बळकटपणे गुंफण्यासाठी वापर करणारे पुंडलीक त्या धाग्यांचा काच होऊ देत नाहीत, हे यासारख्या कथा बारकाईने पाहू लागलो की लक्षात येते.

विद्याधर पुंडलिकांच्या कथाविश्वाचे आशयाच्या अंगाने पाहता आपले असे एक रूप दिसते. काही आशयप्रदेश त्यांना विशेष गुंतवून ठेवणारे आहेत; आणि त्यांचा चिंतनशील वृत्तीने शोध घेत घेत विविध परिमाणे चित्रित करणाऱ्या कथा त्यांनी लिहिल्या आहेत. आपल्याला होणारे आकलन व्यक्त करताना ते नितळपणे उभे राहिले पाहिजे, त्यासाठी लेखक म्हणून आपली भूमिका अलिप्ततेची असावी, अशी खबरदारी जणू ते घेत असतात. हा त्या काळातल्या वाङ्मयीन वातावरणाचाही परिणाम असू शकतो. मात्र त्यातही जन्म-मृत्यूच्या या संघर्षाचा वेध घेताना जणू ते मानवी अस्तित्वाचे गूढच आपल्या सर्व शक्तिनिशी उकलू पाहतात. एरवी तटस्थता जपू पाहणारे पुंडलीक भावनात्मक स्तरावर वा चिंतनाच्या स्तरावर ज्या अनुभवांमध्ये स्वत:वरचे हे पहारे चुकवून गुंतलेले आहेत, त्या कथांनी अधिक उंची गाठलेली आहे, असे म्हणावे लागते. त्यांना हा पहारा चुकवायला लावणारे धागे कोणते आहेत, याची काही एक दिशा शोधण्याचा प्रयत्न प्रस्तुत निबंधाच्या निमित्ताने केलेला आहे.

❖❖❖

**डॉ. विद्यागौरी टिळक**
प्राध्यापक, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ,
पुणे - ४११००७,
भ्रमणभाष : ९४२३००२९५०

## चारुता सागर यांची कथा : समूहमनाची सांकेतिकता

– डॉ. चंद्रकांत पोतदार

*[मराठी ग्रामीण कथेत मोलाचे योगदान करणारे प्रसिद्ध कथाकार चारुता सागर यांचे नुकतेच निधन झाले. मळणगाव (जि. सांगली) येथील परिसर आणि 'दंडोबाचा डोंगर' हे त्यांच्या कथेचे आस्थेचे विषय होते. चारुता सागर यांच्या कथावाङ्मयावरील हा एक दृष्टिक्षेप....*

*ग्रामजीवनातील लोकसमजुती, लोकरूढी, परंपरा, लहरी निसर्ग आणि अस्थिर जीवन ह्या आवर्तात सापडलेली मानवी नात्याची आणि समाजजीवनाची घुसमट– हा कथाविषय घेऊन चारूता सागर यांनी वेगळ्या घाटाची कथा मराठी साहित्याला वाहिली. त्याचे हे सिंहावलोकन.*

*–संपादक]*

॥ १ ॥

मराठी साहित्यात कविता, कादंबरी, नाटक, निबंध या वाङ्मयीन घटकांबरोबरच कथा हा एक समृद्ध वाङ्मयप्रकार होय. काहीशी मूळ संकल्पना, आशयाची व्याप्ती आणि मर्यादा, भोवतालचा परिसर आणि तिथले वास्तव जीवन, मानवी गुंतागुंत, लोकभाषेचा परीघ या सगळ्यांतून एक कथाबीज साकारत असते. परिस्थितीच्या वरवंट्याखाली गुदमरलेला माणूस, ग्रामीण/नागर/महानगरीय विषण्णता या सगळ्यांतून कथा आकारत असते. असे हजारो प्रश्न कथालेखक हाताळत असतो. हरिभाऊ आपटे, वा. ना. देशपांडे, आनंदीबाई शिर्के, शि. म. परांजपे, न.चिं. केळकर, दिवाकर कृष्ण यांच्या कथा विलक्षण प्रतिभेतून व्यापक विचार मांडणाऱ्या अशा होत्या. १९२६ ते १९४५ या काळात मराठी लघुकथा ठळकपणे अधोरेखित झाली. 'यशवंत', 'किर्लोस्कर', 'स्त्री', 'मनोहर', 'पारिजात' यांसारख्या मासिकांनी ही मराठी कथा प्रसिद्ध केली. पुढे ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, य. गो. जोशी, कुसुमावती देशपांडे यांनीही ही कथा समृद्ध केली.

नवकथा (१९४५-१९६०) साकारली ती मानवी जीवनमूल्यांना गेलेले तडे, मानवी विध्वंसकता, विज्ञानाची भीषणता व मानवी स्वभावातील अमानुषता अशा विषयांना घेऊन. प्रसिद्ध कथाकार गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर, पु. भा. भावे, शंकर पाटील, आनंद यादव, चारुता सागर, महादेव मोरे, भास्कर चंदनशीव, सखा कलाल अशी – एक समृद्ध पिढीच ग्रामजीवनाने समृद्ध केली. अस्सल मातीचा गंध आणि कष्टकऱ्यांच्या पाठीवरचे वळ, मातीतलं रुजणं आणि निसर्गाचं रुसणं या सगळ्यांतून एक सुख-दु:खाचे जगणेच अधोरेखित झाले. या सर्व पातळीवर प्रसिद्ध कथाकार चारुता सागर यांची कथा ग्रामसंस्कृतीचा उलगडा करून प्रखर वास्तव मांडणारी कथा म्हणून अधोरेखित झाली.

॥ २ ॥

चारुता सागर यांची मोजकीच पण प्रभावी ठरलेली लेखणी. 'नागीण', 'मामाचा वाडा' आणि 'नदीपार' हे तीनच कथासंग्रह, मात्र मराठी ग्रामीण साहित्यात स्वत:ची वेगळी ओळख निर्माण करणारे असेच आहेत. अत्यंत साध्या-सोप्या आणि सरळ भाषेतून व्यक्त होणारं मानवी जीवन वाचकांच्या मनावर बिंबतं. पाठीपोटाचा प्रश्न सोडविण्यासाठी धडपडणाऱ्या माणसाची आयुष्याची सुरू असणारी लढाई त्यांच्या कथेतून साकारते. पोटासाठी माणूस लाचार होतो, खोटे बोलतो, चोरी करतो, कधीकधी गुन्हेगारी प्रवृत्तीकडे झुकतो, या सगळ्यात तो आपली गरिबी कुठेही

झाकत नाही. अशा कृषिसंस्कृतीचे जगणे, कुणब्याच्या काळजाची कालवाकालव चारुता सागरांच्या कथेत व्यक्त होते. मानवी जीवनाचे अर्थ आणि रंग, मनाची द्विधावस्था, व्यापकतेची भूमिका, स्त्री-पुरुषांच्या द्वंद्वातून व्यक्त होणारे आयुष्याचे हरवलेपण, राबणाऱ्यांच्या घामाला मिळणारी प्रतिष्ठा, मनात खोलवर झालेले आघात सहन करून जगण्याला सामोरे जाणारा शेतकरी, मुक्या प्राण्यांविषयीची व्यापकता, मार्मिक संवाद यातून त्यांच्या कथेचे विश्व साकारते. ग्रामजीवनातली भाषा समूहमनाचे एक प्रतीक म्हणून येते. अन्न-वस्त्र-निवारा या मूलभूत गरजांना टिपताना व्यक्त होणारी संवेदनशीलता चारुता सागर खूप अचूकपणे टिपतात. घटना – प्रसंग – कथेच्या आशयाची गतिशीलता अत्यंत नाट्यमयपणे उभी राहाते. दुर्लक्षित आणि उपेक्षित समाजाचे– विविध जाति-जमातींचे प्रलयकारी दर्शन, हालअपेष्टांचे जगणे या सगळ्यांतून एक समाजजीवन उभे राहाते. ग्रामीण परंपरा, लोकसमजुती, लोकरूढी, ग्रामीण माणसाचे विश्व आणि त्याच्या जीवनपद्धतीचे कंगोरे, दुष्काळी परिस्थितीची भीषणता, प्रेमाचा हळुवारपणा, जोगतिणीच्या आयुष्याची परवड या सगळ्या गोष्टी खूप प्रभावीपणे मांडल्या जातात. माणूस आणि प्राणी यांच्यातील संघर्षाची रूपे; तर कधी कारुण्याने ओथंबलेले जगही पाहायला मिळते.

॥ ३ ॥

चारुता सागर यांच्या कथेत मनोविश्वाचे विविधांगी रूप तसेच लोकसंस्कृती व भावसंवेदनेचे चित्रही दिसते. याशिवाय एक नाट्यात्म बीज त्यांच्या कथेतून साकारते. 'नागीण' ही एक महत्त्वपूर्ण अशी आशयसंपन्न कथा. प्राणी-माणूस यांच्यातील संघर्ष व स्त्री-पुरुष नात्याची शोकात्मिका मांडणारी ही कथा. सापाला घाबरणारी चंद्रा आणि सापाला जणू मारण्याचे वेड असणारा तिचा नवरा बापू, अशा भिन्न प्रवृत्तीच्या माणसांमधली ही कथा. साप ईर्षेला पडतो, ही लोकसमजूत आणि त्याचे येणारे प्रत्यंतर, असे नेमकेपण पकडून कृषिसंस्कृतीचा संदर्भ देऊन चारुता सागर यांनी या कथेला न्याय दिला आहे. चारुता सागरांची समर्थ लेखणी, भाषा, भावना आणि कौटुंबिक नातेसंबंधाची गुंतागुंत याचे साद्यंत वर्णन अंगावर शहारे आणणारे असेच आहे.

'दर्शन' ही जोगतिणीची व्यथा मांडणारी एक महत्त्वाची कथा आहे. जोगतिणीच्या आयुष्याची परवड, तीन पिढ्यांचा संदर्भ, जोगतिणींचा ताफा, ताफ्यातील माणसांचे एकमेकांशी असणारे शारीरिक संबंध, हे सगळे खूपच अस्वस्थ करणारे असे आहे. चवंडका बाळा, नागू, तायना, राघू, बायना, पुतळा असा हा एक पुतळा जोगतिणीचा ताफा; नाचगाणं झाल्यावर पुतळाचं पाय दाबत जवळ सरकणारा नागू आणि पुतळावर जीव ओवाळून टाकणारा राघू ही सगळी शरीरसुखासाठी लालचावलेली माणसं. यापुढे हे दर्शन कुणाकडे सोपवायचं अशा विवंचनेतच बारा वर्षांची रुकी पुढे दिसते. पुतळाला आपला गतकाळ आठवतो. यातून सुटका करायची तर दर्शनची माळ कुणाच्या गळयात घालायची? असा भेडसावणारा प्रश्न. भंडाऱ्याची उधळण, जयघोष, पुतळा संपते आणि दर्शन देवीच्या पायावर पडतं. अशी ही केंद्रवर्ती कथा. स्त्रीच्या–जोगतिणीच्या आयुष्याची हृदयस्पर्शी फरपट दर्शविणारी अशी आहे.

'म्हस' कथेत गोठ्यातली म्हैस आणि तिची देखभाल करणारी काशी यांचे करुणेचे नाते दिसते. लग्नानंतर नव्याने सुरू झालेले काशीचे संसारी आयुष्य आणि दुसरीकडे दावणीला बांधली जाणारी म्हैस. एखाद्या मुक्या जनावरासारखीच आपलीही अवस्था झाली आहे. असेच जणू चित्र दिसते. स्त्री-जीवनातली तरलता आणि मानसिक घुसमट यातून स्त्री-जीवनाची चाकोरी व्यक्त होते. चारुता सागरांची, अचूक प्रासंगिक पकड आणि भावनिक कोंडमारा प्रकटीकरणाची जाणीव,



अनुक्रमणिका

लक्ष्यवेधी अशी आहे. 'म्हस', 'दावं' यांसारख्या कथांमधून कृषिजीवनाचे प्रलयकारी दर्शन तर घडतेच, शिवाय दुष्काळातली होरपळ, दावणीच्या मुक्या जनावरांची वाताहत, पाखऱ्या-हंबिऱ्या या बैलांचे मरण, निराश शेतकरी, चारापाणी मिळेल असा फुका आशावाद या सगळ्यांतून जगण्याची जीवघेणी कसरत करणारा शेतकरी– व्यक्त होताना दिसतो. 'ढोलगं' सारखी एक हळुवार प्रेमकथा असो किंवा 'न लिहिलेलं पत्र' नावाची शाळामास्तर आणि विद्यार्थी यांच्यातील भावनिक नातेसंबंधाची हुरहुर असो, खूपच चटका लावून जाते. शाळा-उनाड पोरं – गरिबीची जाणीव- विचारांची शृंखला - गुरुजींची शिकवण्याची तळमळ – कृष्णा आणि गुरुजी यांच्यातली जवळीक - जिल्हा स्कूल बोर्डाने शाळेवर मिळवलेला ताबा-परिणामी गुरुजींची झालेली बदनामी – मात्र कृष्णाला गुरुजींनी गावी जाऊन येतो अशी दिलेली खोटी आश्वासने गुरुजींना खोटे बोलावे लागणे – गुरुजींच्या परतीची/किमान पत्राची तरी वाट पाहणारा कृष्णा आणि गुरुजींनी कधीच न लिहिलेलं पत्र, असा हृदयस्पर्शी आशय या कथेत भेटतो. चारुता सागरांच्या कथांमधून मानवी नात्याचा असा ओलावा व्यक्त होत राहतो. पापण्यांच्या कडा ओलावून जाव्यात अशी हळुवार – संवेदनशील भाषा हा त्यांच्या कथालेखनाचा एक वैशिष्ट्यपूर्ण भाग आहे.

'वाट' कथेत दंडोबाच्या डोंगरकपारीचा परिसर– भटक्या जीवनाने मायलेकींची झालेली ताटातूट– न पोहोचलेला सांगावा – वाट बघून म्हातारीनं जीव सोडावा, मग सांगावा मिळाला पण उशिराने, तरीही जंगलाचा रस्ता तुडवीत आईच्या भेटीसाठी धावणारी लेक आणि पालं पांगावीत – आईचा शोध घ्यावा– झोपडीची जागा कळते पण राखेचा ढीगच दिसतो, माय गेल्याची जाणीव झाल्यावर लेकीचा फुटलेला हंबरडा– या सगळ्यांतून मायलेकीची ताटातूट खूप चटका लावून जाते. कमीतकमी शब्दांत नेमका आशय पकडणाऱ्या चारुता सागरांची वैशिष्ट्यपूर्णताच मुळात अशा असंख्य घटकांमधून व्यक्त होत राहाते. संवाद-भाषा- आशय- पात्रांची रचना– प्रसंगनिर्मिती– या सर्वार्थाने सकस बनलेली ही कथा होय. 'लेक व्हय तू? तुझी तिनं लई वाट बघितली; डोळ्यांत जीव अडकवून तशीच होती. गेल्या बुधवारी गेली. जीव जाता जात नव्हता. आम्ही बघतच हुतो; जाता-येता. गाठ पडायचीच नव्हती!' कष्टानं तुडवलेली वाट आणि निदान प्रेतावर तरी दोन थेंब पडले तर तेवढंच दु:ख हलकं होईल, अशी भोळी असणारी अपेक्षाही पूर्ण होऊ नये, ही पुन्हा खंत एकूणच वाचकांना खूप अस्वस्थ करते.

।। ४ ।।

'आईचा मृत्यू', 'धुणं', 'दोर', 'सावित्री', 'नदीपार', 'किंकाळी' अशा कित्येक कथा वाचकमनावर बिंबतात, त्यामागील एकमेव कारण आशयाची समृद्धी. विचार – भावना– भाषा– संवेदनशीलता या चार घटकांमुळेच अनेक अर्थांनी ही कथा स्वतंत्र अस्तित्वाचा बाणा जपते. प्राणिजीवन, निसर्गरूपे, कौटुंबिकतेची भूमिका, नियतीचा भोग, जगण्याचे असंख्य प्रश्न, मृत्यूच्या खुणा, भूक आणि भाकरी यांची चाकोरी या सगळ्याच्या मुळाशी असणारी कृषिसंस्कृती खूप व्यापक अशी आहे. 'सायेब' या व्यक्तिरेखेभोवती गुंफलेली 'नदीपार' ही एक महत्त्वाची कथा. सायेब वेडसर नायक, बिडीची थोटकं ओढणारा, पाण्यातून वाहत आलेला साप कचाकचा खाऊन टाकणारा, पाण्यातला मासा कच्चा खाणारा, कुणालाही त्रास न देणारा हा नायक. एकदा ऐन पावसाळ्यात एका झाडाला अडकतो, खूप ओरडतो, मात्र त्याच्या हाकेला कुणीच प्रतिसाद देत नाही. नेहमीप्रमाणे भाई त्याला बोलावतो, मात्र 'सायेब' कसलाच प्रतिसाद देत नाही. भाई जोरजोरात ओरडतो, पण सायेब मात्र केव्हाच हाकेच्याही पल्याड 'नदीपार' झालेला असतो. मुका नायक,



अनुक्रमणिका

जीवघेणे दारिद्र्य, प्राप्त परिस्थिती, जगण्याचे असंख्य प्रश्न, मृत्यूपंथाची वाट अशा सर्व पातळ्यांवर ही कथा अधिक लक्षणीय ठरते.

॥ ५ ॥

सारांश, चारुता सागर यांची एकूण कथा अशी अनेक अर्थांनी स्वतंत्र अस्तित्व जपणारी आहे. दुःखाची परिसीमा मांडणारी भाषा, माणूस आणि प्राणिजीवन यांच्यातील भावनिक नाते, आपल्या डोळ्यांसमोर नात्यातल्या माणसांचे जाणे दिसल्यावर व्याकुळ होणारी असंख्य पात्रे चित्रित करताना व्यक्त होणारी भाषाशैली हे सगळेच खूप वैशिष्ट्यपूर्ण आहे. उपेक्षित आणि वंचित जातिजमातींचे चित्रण खूप प्रत्ययकारी शैलीत त्यांच्या कथेत येते. कोल्हाटी, डोंबारी, जोगते अशा दुर्लक्षितांचे आयुष्य, त्यांच्या हालअपेष्टांचे जग मांडते. चारुता सागर यांच्या कथेत केवळ ग्रामजीवन नाही, तर ग्रामीण परंपरा, संस्कृती, मानवी मनाचा गुंता, समूहमनाची सांकेतिकता, कृषिजीवनाचे बदलते कंगोरे, आशयाची अभिव्यक्ती, माणुसकीचे रंग, वास्तवाची सखोलता या सर्व बाबी व्यक्त होताना दिसतात. भाषिक संकेत, प्रसंगनिर्मिती, व्यक्तिचित्रणे, परिसराचे वर्णन, संवादाची खोली, आशयाची उत्कटता या सर्व वैशिष्ट्यपूर्ण घटकांची बाजू खूप महत्त्वाची आहे. एखादे कथाबीज नाट्यात्मक पद्धतीने मांडण्यात चारुता सागरांची लेखणी नेहमीच उजवी ठरली आहे. वाचकांना कथाशयात गुंतवून ठेवणे आणि कथेतल्या पात्रांना बोलकं करणे ही जादू चारुता सागर यांच्या लेखणीत आहे. आयुष्याच्या अंतिम टप्प्यातही गावच्या माणसांचे, खेड्यातल्या जीवनाचे अनेकरंगी आलेख त्यांना मांडायचे होते. चारुता सागर यांच्या जाण्याने मराठी ग्रामीण कथेत पोकळी निर्माण झाली आहे.

❖❖❖

**डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार**
यशवंतराव चव्हाण महाविद्यालय, हलकर्णी, ता. चंदगड,
जि. कोल्हापूर, भ्रमणध्वनी : ९४२३२८६४७९

**निवास व पत्रव्यवहार :**
मु. पो. मजरे कार्वे, ता. चंदगड,
जि. कोल्हापूर, ४१६ ५०७





अनुक्रमणिका



# लघुकादंबरीचे साहित्यरूप

– डॉ. स्वाती कर्वे

## (दीर्घकथा आणि लघुकादंबरी : तौलनिक अभ्यास)

*[मराठी दीर्घकथा आणि कादंबरी यामधील विभक्तरेषा निश्चित करण्याचे उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवून लिहिलेला हा लेख अभ्यासकांच्या मार्गदर्शनार्थ आहे. युवा लेखक आणि संशोधक यांना प्रोत्साहन देण्यासाठी म. सा. पत्रिका आपले वेगळे सदर सुरू करणार आहे. अन्य अभ्यासकांनाही ह्या पुन्हा चर्चेचा लाभ व्हावा; हा उद्देश ह्या लेखाने सफल व्हावा. ह्यावर प्रतिक्रिया अपेक्षित.*

*–संपादक]*

'लघुकादंबरी' आणि 'दीर्घकथा' हे दोन शब्दप्रयोग आज आपल्याला पुरेसे परिचयाचे झाले आहेत. कथात्म साहित्यातील 'कथा' आणि 'कादंबरी' या दोन परिचित आणि स्थिर लेखनप्रकारांच्या दरम्यान 'दीर्घकथा' आणि 'लघुकादंबरी' या दोन लेखनप्रकारांनी आपले अस्तित्व निर्माण केले आहे.

मराठी साहित्यक्षेत्रात या दोन्ही साहित्य प्रकारांचा १९५० नंतर अधिक विकास होताना दिसतो. 'लघुकादंबरी'च्या संदर्भात विचार करताना असे दिसते की, विश्राम बेडेकर यांच्या 'रणांगण' या कलाकृतीने तिच्या आकृतिबंधाच्या संदर्भात काही प्रश्न उभे केले होते. 'रणांगण' नंतरच्या काळात 'लघुकादंबरी' पुढे येताना दिसते. 'लघुकादंबरी'च्या निमित्ताने काही प्रश्नही उभ राहतात.

'लघुकादंबरी' म्हणजे काय? लघुकादंबरी ही कादंबरीची उपनिर्मिती ('बाय प्रॉडक्ट') आहे की, जीवनदर्शनाचे स्वतंत्र माध्यम आहे? 'दीर्घकथा' आणि 'लघुकादंबरी' यांचे निर्देश अनेकदा अतिशय सैलपणे होताना दिसतात. तेव्हा 'दीर्घकथा' व 'लघुकादंबरी' यांच्यात निश्चित भेद कोणता आहे? यासारख्या निर्माण होणाऱ्या प्रश्नांना समोर ठेवूनच मी 'लघुकादंबरी'चे साहित्यरूप शोधण्याचा प्रयत्न केला.

'लघुकादंबरी'ची तात्त्विक बाजूने मांडणी करणे आणि या तात्त्विक भूमिकेतून 'मराठी लघुकादंबरी'चा शोध घेणे, हे माझ्या अभ्यासाचे दोन भाग होते. प्रस्तुत लेखात या दोन्ही विभागांना मी थोडक्यात आपल्यासमोर ठेवणार आहे.

### 'लघुकादंबरी'ची तात्त्विक बाजू :

साहित्यकलेचा तात्त्विक विचार करण्यासाठी तसेच साहित्याचे अध्ययन व अध्यापन यांना विचारांची पायाभूत बैठक प्राप्त होण्यासाठी 'वाङ्मयप्रकार' ही संकल्पना साहित्यविचाराने एका चौकटीप्रमाणे स्वीकारली आहे. अनुभवाचे स्वरूप विचारात घेऊन भावात्मक, निवेदनात्मक (कथनात्मक) आणि संघर्षात्मक असे तीन विभाग प्रथम केले. व्यवस्थापन व वर्गीकरण हे तत्त्व स्वीकारून 'कथात्म साहित्य' (Fiction) हा एक स्वतंत्र विभागच मान्य केला आहे. ही व्यवस्था आज साहित्यविचार, साहित्यनिर्मिती आणि साहित्याचे वाचक-रसिक या तिन्ही पातळ्यांवर स्वीकारलेली आहे.

कथात्म साहित्यात स्थलकालबद्ध अशा एका गृहीत अवकाशात कार्यकारणभावाने परिपूर्ण असा एक अनुभव जिवंत होत असतो. त्या अनुभवाचे एक विवक्षित केंद्र असते. त्या केंद्राच्या स्वरूपानुसार भिन्न भाषिक अवकाशाचे लेखनप्रकार निर्माण होतात. कथा, दीर्घकथा, लघुकादंबरी व कादंबरी असे चार भिन्न भाषिक अवकाशाचे लेखनप्रकार कथात्म साहित्यात आहेत. प्रत्येक प्रकारातून व्यक्त होणाऱ्या अनुभवाच्या स्वरूपात भेद असल्याने या प्रत्येक प्रकाराचे स्वरूपही



अनुक्रमणिका

स्वतंत्र व वेगळे आपोआपच आहे.

'कथा' एककेंद्री असते. केंद्राला प्रकाशित करणे, इतकाच मर्यादित हेतू कथेचा असतो. त्यामुळे 'कथा' टोकदार होते. कथेचा भाषिक अवकाशही मर्यादित होतो. व्यक्तिरेखा, वातावरण, संवाद, निवेदन, स्थळकाळाचे संदर्भ हे सर्वच घटक कथेला मर्यादित प्रमाणात लागतात. कथेचा होणारा परिणाम; येणारे भानही विशिष्ट अनुभवापुरते मर्यादित येते.

'दीर्घकथा' केवळ केंद्राचा विचार करीत नाही. काही अनुभवांमध्ये जीवानुभवाचा विशिष्ट दिशेने प्रवास होत असतो. उत्क्रांत होणारा जीवनानुभव, एका विवक्षित केंद्रबिंदूपाशी पूर्ण होतो. ते 'दीर्घकथे'चे अंतिम टोक असते. केंद्रानुगामी प्रवास होत असल्याने दीर्घकथेचे परिमाण बदलते. तिचे भाषिक क्षेत्र कथेहून मोठे होते. परंतु ते एकेरी विवक्षित अनुभवापुरतेच असल्याने 'दीर्घकथे'चा विकास 'कथे'च्या तुलनेत कमी वेगाने होत असला, तरी 'कथे'च्या तंत्रानेच होतो. त्यामुळे 'दीर्घकथे'चे नाते 'कथे'ला जवळचे आहे. या उलट 'लघुकादंबरी'चे नाते 'कादंबरी'च्या जवळ जाणारे आहे. 'दीर्घकथे'प्रमाणे 'लघुकादंबरी' एकेरी अनुभवाचा विकास करीत नाही. 'लघुकादंबरी'चे आशयक्षेत्र विस्तृत असते. विशिष्ट व्यक्तिनिष्ठ अनुभवाला 'लघुकादंबरी' भिडत असते. त्यामुळे प्रधान व्यक्तिरेखेचे जीवन, नातेसंबंध, संघर्ष यांचा मोठा कालपट 'लघुकादंबरी'त येतो. व्यक्तिगत आणि सामाजिक जीवनाच्या सीमारेषेवर व्यक्तिनिष्ठ, व्यक्तिकेंद्री असे अनेक अनुभव आकाराला येत असतात. त्यांचा वेध 'लघुकादंबरी' घेते. त्यामुळे आपोआपच स्थळकाळाच्या मिती वाढतात. कथानकासाठी मोठा कालपट लागतो. कथानक जसे घडत येते, तसा विकास करावा लागतो. वातावरण, व्यक्तिरेखा, घटनाप्रसंग, संवाद इ. घटकही जास्त प्रमाणात येतात. विकासाची गती संथ होते. महत्त्वाचे म्हणजे कादंबरी तंत्राने 'लघुकादंबरी' विकसित होते. कादंबरीप्रमाणे अनुभवाची विविध, स्वतंत्र संघटने नसल्याने 'लघुकादंबरी' 'कादंबरी'च्या व्यापकतेवर जात नाही. परंतु मर्यादित ऐवजाच्या जीवनानुभवाला समग्रतेने भिडण्याचा प्रयत्न 'लघुकादंबरी' करते. म्हणूनच 'लघुकादंबरी' 'लघु' असली तरी कादंबरी असते. 'लघुकादंबरी'च्या वाचनातून येणारे भानही विवक्षित अनुभवापुरते येत नसून अधिक व्यापक व सखोल येते. या चारही कथात्मक लेखनप्रकारांमधील भेद व त्यांचे भाषिक अवकाश एका आकृतीतूनही दाखवता येतील.

**कथात्म साहित्यप्रकारांचे बदलते परिघक्षेत्र**




| | | |
|---|---|---|
| १) कथा | : | एककेंद्री जीवनानुभव, मर्यादित अवकाश. |
| २) दीर्घकथा | : | एककेंद्री जीवनानुभवाचा उत्क्रांत होत अंतिम टोकाकडे होणारा प्रवास. मोठा अवकाश. |
| ३) लघुकादंबरी | : | व्यक्तिनिष्ठ, व्यक्तिकेंद्री जीवनानुभवाचा कादंबरीतंत्राने घेतलेला वेध. दीर्घकथेहून मोठा अवकाश. |
| ४) कादंबरी | : | बहुकेंद्री, समग्र जीवनाचा व्यापकतेने वेध घेणारा बहुपेडी अनुभव, विस्तृत, व्यापक अवकाश. |

कथात्म साहित्याचे काही घटक निश्चित करून त्यांच्या तुलनात्मक विचारानेही या चारही प्रकारांमधील भेद स्पष्ट करता येईल. अर्थात ही तुलना किंवा विभागणी शास्त्रीय विषयांइतकी काटेकोरपणे करता येणार नाही, याची जाणीव आहेच.

कथा, दीर्घकथा, लघुकादंबरी व कादंबरी या कथात्म साहित्यातील चारही लेखनप्रकारांना जीवनदर्शनाची स्वतंत्र माध्यमे म्हणून स्वीकारता येते.

'दीर्घकथा' व 'लघुकादंबरी'च्या संदर्भात असे दिसून येते की, या दोन्ही साहित्यप्रकारांचे निर्देश साहित्य व्यवहारात अतिशय सैलपणे होत आले आहेत. समीक्षा व्यवहारानेदेखील या दोन्ही प्रकारांमधील भेद पुरेशा गांभीरतेने विचारात घेतलेला नाही. परिणामी 'दीर्घकथा' आणि 'लघुकादंबरी' यांच्या सीमारेषा धूसर राहिल्या आहेत. 'लघुकादंबरी'च्या संकल्पनात्मक विचारांकडे वळण्यापूर्वी एका उदाहरणाच्या मदतीने या दोन्ही साहित्यप्रकारांतील भेद स्पष्ट करता येईल.

बऱ्याच वाचकांनी आशा बगे यांची 'रुक्मिणी' ही अप्रतिम दीर्घकथा वाचली असेल. महत्त्वाचे म्हणजे या दीर्घकथेची प्रसिद्धी १९८० च्या 'सत्यकथा'च्या दिवाळी अंकात 'कथा' म्हणून झाली होती. परंतु प्रत्यक्षात 'रुक्मिणी' दीर्घकथेचा आकृतिबंध घेताना दिसते. 'रुक्मिणी'ची रचना लेखिकेने ज्या पद्धतीने केली आहे, नायिकेच्या मानसिक वाढीचे टप्पे घेत कथाबीज विकसित केले आहे; त्यातूनच 'रुक्मिणी'चा दीर्घकथेचा घाट स्पष्ट होतो.

एका श्रीमंत इनामदारांच्या वाड्यात आश्रित असणाऱ्या कीर्तनकारांची मुलगी रेणू ही नायिका आहे. इनामदारांचा मुलगा अनंता व मुलगी शकू यांच्याबरोबर वाड्यात मोकळेपणाने वावरत रेणू मोठी होत असते. अनंता मोठा झाल्यावर रेणूला लग्नाची मागणी घालतो. त्यांचे लग्न होते. हा स्थूल घटनाक्रम आहे; परंतु ही केवळ रेणू व अनंता यांच्या विवाहाची कथा नाही. रेणूचा मानसिक प्रवास, सत्त्व जपणारी तिची व्यक्तिरेखा, प्रत्येक टप्प्यावर असणारी तिची भावस्थिती आशा बगे यांना दाखवायची आहे. त्यामुळे विवाह ही अंतिम घटना नाही. बालपणचा सवंगडी या नात्यानंतर प्रियकर- पती या रूपात अनंताला मनात कोणतेही विकल्प न ठेवता स्वीकारणे, त्याच्याशी समरस होण्यास सिद्ध होणे, हा रेणूचा मानसिक प्रवास, त्या दिशेने रेणूची होणारी वाढ चित्रित करणे, हा आशा बगे यांचा निश्चित हेतू आहे. त्यामुळेच कथा त्यांच्या विवाहापाशी थांबत नाही. रेणूने अनंताचा पती म्हणून स्वीकार करण्यापाशी पुढे जाऊन कथा थांबते.

रेणू स्वाभिमानी, सत्त्व जपणारी आहे. 'आपण आश्रित आहोत' ही तिला घेरणारी बोच आहे. तिच्या भावस्थितीला अनेक कंगोरे आहेत. तसेच अनेक गोष्टींना महत्त्व आहे. पंतांची 'द्रौपदी', 'रुक्मिणी' यांच्यावरची आख्याने, आजीचे कृष्णावरचे प्रेम, त्याला विविध रूपांत स्वीकारणे, संध्याकाळी देवळाच्या कळसावर जमणारे पोपट, फुलणारा गुलमोहर या सर्वांना तिच्या भावस्थितीत विशिष्ट जागा आहे. ज्या परिस्थितीत ती वाढली आहे, त्याचे तिच्या मनावर ओझे आहे. म्हणूनच अनंतापर्यंत जाणारी तिच्या मनाची वाट नुसतीच लांब नाही, खाचखळग्यांची, लहान लहान टेकड्या वाटेत असणारी आहे. त्यामुळे केवळ अंतिम टप्प्याला फुलवणे पुरेसे नव्हते. ते अनुभवाचे केंद्र नाहीच. त्यामुळे 'दीर्घकथे'चा घाट 'रुक्मिणी'ला अपरिहार्यच होता. रेणूचे वय वर्षे दहा ते वीस हा कालखंड तिच्या मानसिक वाढीनुसार टप्पे पाडून लेखिकेने विकसित केला आहे. पुढील आलेखातून रेणूच्या मानसिक बदलाच्या वाढीचे टप्पे आणि त्यातून उत्क्रांत होत जाणारा अनुभव अधिक स्पष्ट होईल.

'रुक्मिणी' या दीर्घकथेचा विकासक्रम




क्ष ते अ कथानकाचे टप्पे. अ ते फ पृष्ठसंख्या

१-ब : बालपणचे मैत्रीचे नाते. अनंताच्या परगावी जाण्याने दु:खी होणारी रेणू.

२-क : काळाचा मोठा टप्पा पूर्ण. विवाहाच्या मागणीचा विचार करणारी रेणू.

३-ड : विवाहाची घटना. सतत विचार करणारी, अनंताच्या मागणीमागील हेतू ताडून बघणारी रेणू.

४-इ : विवाहानंतर गोंधळून जाणारी, अनंताला शोधू पाहणारी रेणू. स्त्री-जीवनातील स्थित्यंतराच्या क्षणी वावरणारी रेणू.

५-फ : शेवटचा महत्त्वाचा टप्पा. सर्व अडसर दूर होऊन अनंताचे स्वच्छपण जाणवल्यावर त्याच्याशी समरस होणारी रेणू.

'दीर्घकथे'प्रमाणे 'लघुकादंबरी'चे अवकाशक्षेत्रही स्पष्ट करता येईल. श्री. ना. पेंडसे यांची 'यशोदा' ही लघुकादंबरी उदाहरण म्हणून घेता येईल. 'मौज' दिवाळी १९५६ च्या दिवाळी अंकात 'यशोदा' 'लघुकादंबरी' म्हणूनच प्रसिद्ध झाली होती.

श्री. ना. पेंडसे यांनी 'यशोदा' ही 'लघुकादंबरी' अत्यंत खुबीने विकसित केली आहे. 'यशोदा' दीर्घकथा आहे का? असा फसवा भास पृष्ठभागावर पसरलेला पदर निर्माण करतो. यशोदेला दिवस गेले आहेत ही गोष्ट घरात कळते. घरात एक कल्लोळ उठतो. यशोदेची चौकशी, निराकरणाचे प्रयत्न आणि शेवटी विठोबा सामलबरोबर यशोदाचा होणारा विवाह हा पदर 'यशोदा'च्या अनुभवविश्वाला एखाद्या वेष्टनाप्रमाणे गुंडाळलेला आहे. तो बाजूला केला की अनुभवातील आशयाची एकातून एक उलगडत जाणारी तीन वर्तुळे दिसतात. ती तिन्ही वर्तुळे घेऊनच 'यशोदा'चे अनुभवविश्व पेंडसे यांच्या मनात साकार झाले आहे. बाह्य पदराला समांतररीतीने अत्यंत खुबीने श्री. ना. पेंडसे यांनी 'यशोदा'च्या जीवनातील एक पर्व या तीनही वर्तुळांसह चित्रित केले आहे. त्यामुळे 'यशोदा' दीर्घकथा न होता 'लघुकादंबरी' होते.

यशोदा इथे केंद्रवर्ती ठिकाणी आहे. यशोदाच्या विवाहापूर्वीचा एक विलक्षण कालखंड इथे आहे. शरीरसुखाच्या मोहाच्या दिशेने होणारी तिची वाढ आहे. त्याभोवती तिचे आणि अण्णा खोत यांचे विशिष्ट संबंधांचे दुसरे वर्तुळ आहे. त्याबाहेर तिसरे मोठे वर्तुळ आहे. त्यामध्ये यशोदाचे अन्य व्यक्तींशी वेगवेगळ्या प्रकारचे संबंध आहेत. 'यशोदेला दिवस जाणे' या घटनेशी या वर्तुळावरची प्रत्येक व्यक्ती संबंधित आहे. या वर्तुळावर आंधळा काका, ताई, मुर्डीची अक्का, ताईचा उनाड मुलगा बाबू आणि गारंबी हे गाव आहे. पेंडसे एखाद्या व्यक्तिरेखेप्रमाणे 'गारंबी'चा उल्लेख करतात. 'यशोदा'मधील अनुभवविश्वाचे स्वरूप पुढील आकृतीतून अधिक स्पष्ट होईल.






अनुक्रमणिका

१) पहिले वर्तुळ – यशोदाचे जीवन.

२) यशोदा व अण्णा खोत यांच्या संबंधांचा स्वतंत्र भाग या अनुभवात आहे. या संबंधांतूनच विशिष्ट प्रकारे शेवट होत आहे.

३) यशोदा व इतर यांचे संबंध या वर्तुळावर आहेत.

एक स्वप्न म्हणून यशोदाकडे बघणारे काका, ताई, आक्का आहेत. काकांनी तिला वाढवले आहे. त्यांना तिला पाहायचे आहे. 'विठोबाबरोबरचा विवाह' हा तोडगा त्यांना मान्य नाही. ताई-आईच्या मायेने बघणारी आहे. यशोदाच्या विवाहाची तिने स्वप्ने बघितली होती. आक्काला रूप व श्रीमंतीचा तोरा आहे. यशोदाला मारून ती धाकात ठेवू बघते.

बाबूताईचा उनाड मुलगा, ताईशी पटत नसते. यशोदाच्या हकिकतीने त्याला बोलायला निमित्त मिळते. गारंबी गावात यशोदा मोठी होते. सुंदर, मनमोकळी- साऱ्या गारंबीलाच तिच्याविषयी लोभ आहे. त्यामुळे एका व्यक्तिरेखेप्रमाणे गारंबी अनुभवविश्वात आहे.

हे सर्व पदर श्री. ना. पेंडसे यांना अनुभवात दिसत आहेत. त्या सर्वांना यशोदेबरोबर चित्रित करण्याचे त्यांचे स्पष्ट प्रयोजन आहे. त्यामुळे या कलाकृतीतील अनुभवाचे केंद्र केवळ यशोदा जसे नाही, तसेच तिला दिवस जाणे व शेवटी तिचा विवाह होणे. या घटनाक्रमापुरतेही मर्यादित नाही. श्री. ना. पेंडसे यांच्या मनात 'यशोदा' विकसित झाली आहे, ती भोवतालचा सर्व पसारा घेऊनच विकसित झाली आहे. हे सारे पदर त्यांना स्पष्टपणे जाणवले आहेत. त्या सर्व पदरांच्या मेळातून एक विलक्षण जीवनानुभव श्री. ना. पेंडसे यांना द्यायचा आहे. त्यामुळे 'यशोदा' मधील तीन पदरांनी परिपूर्ण असणारा अवकाश 'लघुकादंबरी'च्या आकृतिबंधाची अटळपणे, अपरिहार्यपणे मागणी करतो.

'यशोदा' या 'लघुकादंबरी'च्या विवेचनाच्या आधारेच 'लघुकादंबरी' हा एक स्वतंत्र भाषिक अवकाश असणारा कथात्म साहित्याचा स्वतंत्र लेखनप्रकार आहे, या निष्कर्षाप्रत येता येते.

लघुकादंबरीचे साहित्यरूप निश्चित करताना 'लघुकादंबरी'ची संकल्पना व व्याख्या करता येते.

**लघुकादंबरीची संकल्पना**

संकल्पना (Concept) ही ज्ञानव्यवहारातील एक संज्ञा (Term) आहे. एखाद्या विषयाच्या मांडणीसाठी ती एक महत्त्वाची पायरी आहे. अन्य साहित्यप्रकारांप्रमाणे 'लघुकादंबरी' जीवनदर्शनाचे एक माध्यम आहे. एक लेन्स आहे. प्रत्येक लेन्सची एक पोहोचमर्यादा (Limit) असते. तशी पोहोचमर्यादा 'लघुकादंबरी'ची सुद्धा आहेच.

व्यक्तिनिष्ठ-व्यक्तिकेंद्री जीवनानुभव हे लघुकादंबरीचे खरे लक्ष्य आहे. त्याप्रकारचे जीवनानुभव प्राधान्याने 'लघुकादंबरी' आपल्या पंखाखाली घेत खोलवर तपासत जाते. मध्यवर्ती जीवन, त्याभोवती असणारे नातेसंबंधांचे जाळे, त्यातील ताण, व्यक्तिरेखांचा विकास, हे सारे मोजक्या ऐवजाला घेऊन लघुकादंबरी चित्रित करते. मध्यवर्ती व्यक्तिरेखेच्या जीवनातील विशिष्ट कालखंड असला, तरी त्याचे सर्व धागेदोरे उलगडत कादंबरीतंत्राने त्याचा आविष्कार लघुकादंबरी करते. लघुकादंबरीतील जीवनानुभव स्थलकालबद्ध असा असतो; परंतु अनुभवाच्या कक्षा समाजजीवनापर्यंत संक्रमित होणाऱ्या नसतात. त्यामुळे तो विवक्षित अनुभव त्या काळाचा प्रातिनिधिक अनुभव नसतो. विशाल जीवनप्रवाहात व्यक्तिगत आणि सामाजिक यांच्या सीमारेषेवर रेंगाळणारे जे जीवनानुभव असतात, त्यांचा वेध लघुकादंबरी घेते. त्यामुळे अनुभवाचे एकच संघटन असते. पर्यायाने लघुकादंबरीच्या वाचनातून येणारे भानही मर्यादितच असते. कादंबरीइतके ते भान विस्तृत व व्यापक नसते.





अनुक्रमणिका

**लघुकादंबरीची व्याख्या**

घटना, प्रसंग यांची कार्यकारणभावाने गुंफण करून; संवाद, वातावरणनिर्मिती या घटकांच्या मदतीने मोजक्या व्यक्तिरेखांच्या जीवनाला व्यापणारा, अधिकतर व्यक्तिकेंद्री असा कादंबरीतंत्राने विकसित होणारा अनुभव, जो कथेहून मोठा व कादंबरीहून लहान असा कथात्म लेखनाचा प्रकार आहे, त्याला 'लघुकादंबरी' असे म्हणता येईल.

**मराठी लघुकादंबरी :**

मराठी लघुकादंबरीचे स्वरूप सूत्ररूपाने थोडक्यात मांडता येईल. मराठी लघुकादंबरीचा शोध म्हणजे मराठी लघुकादंबरीच्या निर्मितिप्रक्रियेचा शोध आहे. जरी 'रणांगण' या कादंबरीने 'लघुकादंबरी'चा एक घाट सिद्ध केला होता, तरी 'लघुकादंबरी' असे जाणीवपूर्वक विशेषण प्राप्त होऊन 'बनगरवाडी' ही लघुकादंबरी १९५५ मध्ये प्रकाशित झाली. त्यापूर्वी १९५४ च्या 'मौज'च्या दिवाळी अंकात 'बनगरवाडी' दीर्घकथा म्हणून प्रसिद्ध झाली होती. 'मौज' दिवाळी १९५४ च्या अनुक्रमणिकेत तसा निर्देश आहे. १९५५ मध्ये 'बनगरवाडी' पुस्तकरूपाने प्रसिद्ध करताना 'बनगरवाडी'ची जाहिरात 'लघुकादंबरी' अशा विशेष निर्देशाने झाली होती.

बनगरवाडी : व्यंकटेश माडगूळकर - 'गेल्या वर्षी दिवाळीत सर्वांची एकमुखी प्रशंसा मिळविणारी 'लघुकादंबरी' लवकरच प्रसिद्ध होणार' (सत्यकथा : ऑगस्ट ५५ मलपृष्ठावरील मजकूर).

म्हणूनच मी 'बनगरवाडी'१९५५ हा एक बिंदू निश्चित करून 'मराठी लघुकादंबरीची निर्मितिप्रक्रिया' शोधण्याचा प्रयत्न केला.

कोणतीही नवता ही कधी कोणत्याही पोकळीतून जन्म घेत नाही. परंपरेच्या प्रवाहातच नवता जन्म घेत असते. परंपरा व नवता यांचे नाळेचे नाते विचारात घेऊनच मी 'बनगरवाडी'पूर्व मराठी साहित्यात 'लघुकादंबरी'चा शोध घेतला. त्यामध्ये 'कादंबरी' व 'कथा' या दोन साहित्यप्रकारांचा ऐतिहासिक मागोवा मी सूक्ष्मतेने घेतला, कारण या दोन साहित्यप्रकारांच्या दरम्यानच 'मराठी लघुकादंबरी'चा जन्म आहे. हा शोध घेताना असे दिसून आले की, आधुनिक वाङ्मयाची निर्मिती, कथात्म साहित्याचा जन्म, वाङ्मयीन दृष्टीचा विकास, साहित्य विचारांमध्ये येणारी प्रगल्भता, सामाजिक, सांस्कृतिक परिस्थिती– त्यातून निर्माण होणारी स्थितिगती या सर्वांचा निकटचा संबंध लघुकादंबरीच्या निर्मितिप्रक्रियेत आहे. हरिभाऊ आपटे यांच्या एकूणच वाङ्मयीन कार्याच्या टप्प्यापाशी 'कादंबरी' या वाङ्मयप्रकाराच्या प्रभावातून कादंबरीमालांच्या निर्मितीला प्रेरणा मिळाली. कादंबरीमालांच्या रूपाने वाहत येणारा प्रवाह, 'कादंबरी' व 'कथा' या दोन प्रधान वाङ्मयप्रकारांमध्ये होणारे रूपबदल आणि वाङ्मयीन दृष्टिकोनातील बदल इत्यादींचा प्रभाव लघुकादंबरीच्या निर्मितिप्रक्रियेवर प्रामुख्याने आहे. मराठी लघुकादंबरीची निर्मितिप्रक्रिया अशी विविध प्रवाहांनी आकाराला आलेली आहे.

सामाजिक-सांस्कृतिक स्थितिगतीतून वाङ्मयीन स्थितिगती आकाराला येते, परंपरा निर्माण होतात. त्यातून निर्माण वाङ्मयीन प्रवाहातच 'मराठी लघुकादंबरी'ची स्थितिगती तयार झालेली आहे.

साधारणपणे १९३१ नंतर पु. य. देशपांडे, विभावरी शिरूरकर यांच्या कादंबऱ्या (उदा. पु. य. देशपांडे- 'सुकलेलं फूल', 'सदाफुली'- विभावरी शिरूरकर - 'हिंदोळ्यावर', 'विरलेलं स्वप्न') 'लघुकादंबरी'चा आकार घेताना दिसतात. तेव्हा मुख्य वाङ्मयीन प्रवाहाखालून कादंबरीमालांच्या रूपाने वाहत येणारा प्रवाह मुख्य प्रवाहाशी जोडला जाताना दिसतो. 'रणांगण'पाशी लघुकादंबरी स्वतःचा स्वतंत्र आकृतिबंध सिद्ध करून आकृतिबंधाविषयी नवीन विचारांना आवाहन करते. त्यानंतर मर्ढेकरांच्या तीन लघुकादंबऱ्या पुढील

प्रवास निश्चित करतात. मर्ढेकरांची नवसमीक्षा, 'सत्यकथा' मासिकाने स्वीकारलेली नवीन पुरोगामी वाङ्मयीन भूमिका, द्वितीय जागतिक महायुद्ध, त्यातून उदयाला येणारे अधिक संकुचित अनुभवविश्व, नवकथेच्या उत्तरकाळात 'मराठी कथे'चे संकुचित होणारे आशयक्षेत्र इत्यादी कारणांतून अधिक विस्तृत अवकाश असणाऱ्या घाटाची, आकृतिबंधाची मागणी निर्माण होत होती. या तप्त झालेल्या (जनरेट) परिस्थितीत 'मराठी लघुकादंबरी' पुढे येताना दिसते.

परंपरा आणि नवता यांच्या साखळीतून उदयाला येणारा कोणताही नवीन आकृतिबंध साहित्याच्या मध्यवर्ती प्रवाहात समाविष्ट होताना प्रायोगिक स्तर, जाणीवपूर्वक निर्मितीचा स्तर व लोकप्रिय स्तर या तीन स्तरांवरून विकसित होत येतो. या तीनही स्तरांवरून येणारी निर्मितीची परिक्रमा 'मराठी लघुकादंबरी'ने पूर्ण केली आहे. आज ती पठारावस्थेला पोहोचली आहे. १९६०नंतरचे सामाजिक बदल, स्थित्यंतरे यांना संवादी राहून लघुकादंबरीने आपला प्रवास केला आहे. स्वतंत्र लेखनप्रकार म्हणून पृथकत्व सिद्ध केले आहे. मराठी लघुकादंबरी आपल्या स्वतंत्र रूपविचारांची मागणी करीत समीक्षक-अभ्यासक यांना आवाहन करीत आहे.

◇◇◇

**डॉ. स्वाती कर्वे**
५ अॅव्हेन्यू, ब्लॉक नं. २०३,
शेठ उत्तमचंद गांधी मार्ग, सिटी प्राईड,
कोथरूडजवळ, कोथरूड, पुणे ३८.

---

## नवे आजीव सभासद, पाटण

१) डॉ. सोपानराव हणमंतराव चव्हाण
२) सौ. मीराताई सोपानराव चव्हाण
३) प्रा. डॉ. पांडुरंग जगन्नाथ ऐवळे
४) प्रा. सौ. रामकली रमाकांत पावसकर
५) प्रा. भाऊसाहेब नेमगोंडा पाटील
६) प्रा. विनायक शरदचंद्र राऊत
७) प्रा. डॉ. विनायक बापू कुरणे
८) प्रा. चंद्रशेखर मुरलीधर विंचू
९) प्रा. डॉ. शिरीषकुमार धोंडीराम पवार
१०) प्रा. विजयकुमार श्रीपती पानस्कर
११) प्रा. नागेश गुरप्पा वाले
१२) प्रा. सौ. पौर्णिमा मोरे
१३) प्रा. डॉ.सौ.हेमलता विजय काटे
१४) प्रा. दत्तात्रय दादू थोरात
१५) प्रा. सुनिलराव लक्ष्मणराव पानस्कर
१६) प्रा. कु. रंजनादेवी बाजीराव चव्हाण
१७) प्रा. सुहास सुधीर कांबळे
१८) प्रा. दादासाहेब ज्ञानू चव्हाण
१९) प्रा. प्रकाश एकनाथ बनसोडे
२०) प्रा. डॉ. सुभाष विठ्ठल मोरे
२१) प्रा. सौ. राजमती राजाराम पाटील
२२) प्रा. नंदकुमार गणपती जाधव
२३) प्रा. डॉ. बापूराव विष्णू जाधव
२४) प्रा. गौतम सखाराम झुळझुळे
२५) प्रा. डॉ. राजेश काशिनाथ निमट
२६) प्रा. संजय रघुनाथ सुपनेकर
२७) प्रा. उमाजीराव आकोबा नायकवडे
२८) श्री. भरत आनंदराव वरेकर
२९) श्री. मनोहर संपत यादव
३०) श्री. विश्वनाथ ज्ञानदेव नलवडे
३१) श्री. मोहमद शफी बापूसाहेब खतीब
३२) श्री. दिनेश तुकाराम माने
३३) श्री. रमेश तातोबा माने
३४) श्री. मोहन रघुनाथ मोकाशी
३५) श्री. विजय धोंडीबा कदम
३६) कु. स्नेहलता विष्णू देडगे
३७) सौ. ज्योती कृष्णत जंगम
३८) श्री. शशिकांत महादेव देवडकर
३९) श्री. चंद्रकांत आनंदराव पाटील
४०) श्री. सुर्यकांत सिताराम पुजारी
४१) श्री. दिलीप लक्ष्मण संकपाळ
४२) श्री. प्रकाश ज्ञानदेव गायकवाड
४३) श्री. अधिकराव जगन्नाथ सावंत
४४) श्री. शिवाजी धुळाराम भोसले
४५) सौ. वैशाली आनंदराव जाधव
४६) श्री. शिवाजी गणपत भिसे
४७) सौ. आनंदी यशवंत गायकवाड
४८) श्री. शंकर जगन्नाथ सुतार
४९) श्री. अनिल हरी यादव
५०) श्री. दत्तात्रय शंकर पाटील
५१) श्री. जयसिंग यशवंत चव्हाण
५२) सौ. विजया सदाशिव नांगरे
५३) श्री. आबासाहेब विठ्ठल भोळे
५४) श्री. बबन परवती कदम
५५) श्री. सुरेंद्र व्यंकटराव पाटील
५६) सौ. अनुपमा विश्वास बर्गे
५७) कु. सुनिता यशवंत कांबळे
५८) सौ. उषा रविंद्र निकम
५९) श्री. सुनिल तुकाराम जाधव
६०) श्री. आनंदराव हणमंत लोहार
६१) श्री. महादेव जगन्नाथ गिरीगोसावी
६२) सौ. स्नेहल सुनिल यादव
६३) श्री. प्रविण प्रकाशराव पाटील
६४) श्री. नारायण सर्जेराव चव्हाण
६५) श्री. बापूराव राघू घाडगे
६६) श्री. दिनकर शंकरराव माथणे
६७) श्री. निलेश शंकर रेडीज
६८) श्री. रामचंद्र मारुती गावडे
६९) प्रा. पोपट भाऊ रोडे
७०) प्रा. दिलीपकुमार परशुराम जाधव
७१) प्रा. श्रीमती. शारदा दादू भालेकर
७२) प्रा. शीतल अजय किरपेकर

## 'माणदेशी शाहीर :
## बावाखान दरवेशी यांची भेदिक शाहिरी....'

– प्रा. जवाहर लक्ष्मण मोरे

*[संत कबीरांची निर्गुणी अभंग/भजने प्रसिद्ध आहेत. निर्गुणी शाहिरीची ओळख ह्या लेखाने होईल अशी आशा आहे. माणदेशीचा 'तुरे'वाला बावाखान दरवेशी याच्या निर्गुणी शाहिरीचे आणि त्याच्या आध्यात्मिक व्यक्तिमत्त्वाचे दुर्लक्षित क्षेत्र लेखकाने परिश्रमपूर्वक संपादित केले आहे. शाहीर हे आपापल्या काळातील राजकीय व सामाजिक इतिहासाचे साक्षीदार आणि प्रबोधनकार असतात याचा प्रत्ययही ह्या लेखातून येतो. शाहिरी ढंगात बावाखानांनी लिहिलेली कथाकाव्ये आणि रूपककाव्येही उद्‌बोधक आहेत. –संपादक]*

महाराष्ट्राची भूमी ही विविध परंपरा लाभलेली पवित्र भूमी आहे. संतांनी वारकरी संप्रदाय फुलवला, शूरवीरांनी आपल्या पराक्रमाने महाराष्ट्राची शान वाढवली. अनेक व्यासंगी पंडितांनी महाराष्ट्रातील सांस्कृतिक चळवळींना प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. नंतर लोकजीवनातील अनेक प्रसंगांतून शाहिरी काव्य जन्माला आले. चौदाव्या शतकात उगम झालेल्या आणि सतराव्या शतकात बहरास आलेल्या अग्निदासापासून ते एकोणिसाव्या शतकातील अनेक नामवंत शाहिरांपर्यंत सर्वांनीच आपल्या रचनेने विविध अंगांनी शाहिरी कवितेचे दालन समृद्ध केले. सर्व शाहीर हे विविध जाति-धर्मातील असून, त्यांनी महाराष्ट्रातील संस्कृती जोपासली आहे. लोकरंजन, लोकजागृती, स्वभाव विसंगती, भक्ती, प्रीती ही वैशिष्ट्ये जपली आणि वृद्धिंगत केली आहेत.

ही शाहिरांची परंपरा विसाव्या आणि एकविसाव्या शतकातही अबाधित राहावी म्हणून महाराष्ट्रातील विविध भागांत थोड्याफार प्रमाणात चालू होती. लावणी, कटाव, गौळण, विविध विषयांवरील कवने व स्फुट रचना यांच्या माध्यमांतून शाहिरी काव्य फुलत होते. ही परंपरा बहुतांशी मौखिक स्वरूपात होती. याच दरम्यानच्या भेदिक-शाहिरी परंपरेतील माणदेशातील शाहीर बावाखान शेख यांचे नाव घेणे उचित ठरेल. शाहीर बावाखान हे सांगली जिल्ह्याच्या आटपाडी तालुक्यातील दिघंची या खेडेगावातील भेदिक शाहीर म्हणून प्रसिद्ध होते. शाहीर बावाखान यांनी भेदिक कविता, पोवाडे, लावण्या, साकी, कटाव, ऐकीव, पदे, प्रबोधनपर व जागृतीपर कवने, स्फुट रचना अशा विविध प्रकारचे लेखन केले आहे. अशा उपेक्षित व अप्रकाशित शाहिराच्या व्यक्तिमत्त्व आणि शाहिरी काव्याची ओळख करून देणे मला आवश्यक वाटले, म्हणून हा लेखप्रपंच!

भेदिक शाहिरीचे क्षेत्र व्यापक करून सामाजिक व धार्मिक विषय हाताळण्यात जे जे शाहीर यशस्वी झाले, त्यांमध्ये माणदेशातील शाहीर बावाखान दरवेशी यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. भेदिक शाहिरांनी आजतागायत आपापल्या पातळीवर विश्वनिर्मितीच्या संकल्पना कूट प्रश्नावलीतून मांडल्या आहेत. सदर संकल्पनेतून कलगी व तुरा पक्ष जतन करण्याचे काम केले जाते. त्याचप्रमाणे बावाखान यांनीही तुरा पक्ष जतन करण्याचे काम केले. त्यांची परंपरा आजही अनेक शिष्य चालवीत आहेत. त्यांच्या शाहिरी काव्याचा फड आजही सांगली, सातारा, सोलापूर जिल्ह्यांत अनेक शिष्यगण गाजवीत आहेत. त्या शाहिराचे पूर्ण नाव बावाखान बाळाभाई शेख. आटपाडी तालुक्यातील करगणी या खेडेगावात मुस्लिम समाजातील दरवेशी कुटुंबात त्यांचा जन्म झाला. दरवेशी हा परंपरागत भटकंती स्वरूपाचा व्यवसाय असल्याने जन्मतारखेची निश्चित नोंद आढळत नाही. अस्वल खेळविण्याच्या (दरवेशी) व्यवसायामुळे

शाहिरांना बावाखान दरवेशी याच नावाने सर्वजण ओळखत. स्थलांतरीत आणि भटक्या स्वरूपाचे जीवन असल्याने त्यांना सांगोला तालुक्यातील खवासपूर, लोटेवाडी व आटपाडी तालुक्यातील दिघंची, करगणी येथे स्थलांतर व वास्तव्य करत-करत चौथीपर्यंत शिक्षण घेता आले. वयाच्या सोळाव्या वर्षी मणेराजूरी (ता. तासगाव, जि. सांगली) येथील बायमाबी या नऊ वर्षांच्या कन्येशी विवाह झाला. पुढे दरवेशी व्यवसाय बंद करून आठवडा बाजारात गावोगावी गोफ, रिबन, मंगळसूत्र गाठवणे हा छोटेखानी व्यवसाय सुरू केला; आणि खऱ्या अर्थाने तेथूनच बावाखान शाहिरांची शाहिरी फुलत गेली. बाजारात गेल्यानंतर रिकाम्या वेळेत ते कवने रचीत व लिहून ठेवीत. गोफ, रिबन विकत-विकत, कवने रचत-रचत संसाराचा गाडा ते ओढत होते. त्यांना चार मुली झाल्या, मुलगा झालाच नाही. मुलींची जबाबदारी पेलत मुली मोठ्या झाल्या, लग्नंही झाली. पण दुर्दैवाने गुलपरी, शहजादी व नसीमा या मुली करगणी येथे आईजवळच राहतात. ताजबी ही थोरली मुलगी कोल्हापूर जिल्ह्यातील दरवेशपाडळी येथे संसार करत आहे. वंशाला दिवा नसल्याचं दु:ख शाहिरांच्या पत्नीला होतं, म्हणून ती शाहिरांकडे दुसरं लग्न करण्याचा अट्टाहास धरत होती. पण बावाखान यांनी पत्नीला निक्षून सांगितले की, हे भगवंताचे देणे आहे, नशिबात जे आहे त्यात बदल होणार नाही. त्यामुळे त्यांनी दुसरे लग्न केले नाही; आणि मुलगा न होण्याची खंतही त्यांनी कधी बाळगली नाही.

कौटुंबिक परिस्थिती बेताची, आर्थिक विवंचना आणि हलाखीची परिस्थिती या सर्वांवर मात करत शाहीर संसार करत होते. त्यातून अधिक वेळ ते काव्यरचनेत घालवत असत. त्यांनी लेखन हे दिघंची आणि करगणी येथील राममंदिरात बसून केले आहे. मुस्लिम असूनही त्यांनी हिंदू धर्मातील सर्व ग्रंथांचा सखोल अभ्यास केला होता. अध्यात्माची विशेष गोडी त्यांना होती. करगणी येथे होत असणाऱ्या अखंड हरिनाम सप्ताह, ज्ञानेश्वरी पारायण सोहळा या धार्मिक कार्यक्रमांत त्यांचा महत्त्वाचा सहभाग होता. पहाटे पाच वाजता नित्यनेमाने उठून, स्नान करून रोज एक तरी काव्य रचणे, ही त्यांची सवय होती. म्हणूनच त्यांचे विपुल लेखन झाले आहे. पण परिस्थतीमुळे प्रकाशित करता आले नाही. त्यांच्या लेखनामुळे गावोगावी या शाहिराची चर्चा होऊ लागली, लोक येऊ लागले, बैठका होऊ लागल्या, बैठकांचे रूपांतर काव्य रचण्यात होऊ लागले. विविध विषयांवर चर्चा आणि लेखन होऊ लागले.

त्यांना शाहिरी काव्याचे बाळकडू घरातच मिळाले होते. बावाखान यांचे चुलते दादूभाई शेख यांच्याकडून त्यांनी काव्याचे धडे गिरवले होते. म्हणून शाहीर बावाखान शेख हे दादूभाई यांना गुरू मानीत. त्याचबरोबर या शाहिराच्या काव्यप्रतिभेस खरं मार्गदर्शन लाभलं ते सातारा जिल्ह्यातील खेड येथील रामचंद्र जोशी यांच्याकडून. जोशी हे खेडचे असल्याने ते रामचंद्र खेडकर म्हणून जास्त परिचित होते. बावाखान त्यांना प्रतिगुरू मानत. त्यांच्या तालमीत बावाखान तयार होत होते. त्यांची गुरु-शिष्य परंपरा मोठ्या प्रमाणात होती. संपूर्ण माणदेशात आणि कानाकोपऱ्यात शिष्य तयार झाले होते. काही शिष्यांचे निधन झाले असून, शाहिरांची मुलं कार्यक्रम करतात. बावाखान यांच्या घराण्याची परंपरा म्हणून आजही मंगळवेढा तालुक्यातील खडकी येथील चुलतबंधू दादाभाई बाबालाल शेख हे शिष्यरूपाने चालवतात. तसेच दिघंची येथील शाहीर जयवंत रणदिवे हे पट्टशिष्य म्हणून ओळखले जातात. शाहीर बावाखान गावोगावी आपला ताफा नेऊन कार्यक्रम करत. ज्या ज्या ठिकाणी शाहीर कार्यक्रमासाठी जातात त्या त्या ठिकाणी ते जिंकूनच येतात, अशी त्यांची ख्याती होती. डफ, तुणतुणे, झांजरी, ढोलकी आणि पेटी या वाद्यांची साथ घेत कलगी-तुऱ्याचा जंगी सामना रंगला की, कलगीवाल्याची भंबेरी उडवण्याची ताकद बावाखान यांच्या काव्यात आणि ताफ्यात होती.

बावाखान यांचे नाव गाजत होते. त्यांची ख्याती पश्चिम महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात पसरत होती. त्यांचे नाव ऐकून बागणीचे शाहीर रमजान शेख, महाराष्ट्राचे नामवंत शाहीर साबळे, शाहीर विठ्ठल उमप, तमाशा कलावंत रघुवीर खेडकर व काळूबाळू हे बावाखान यांच्याकडून वगनाट्ये घेऊन जात असत, अशी आठवण मोठ्या उत्साहात दादाभाई सांगतात.

अशा या माणदेशातील शाहिराचे शिक्षण चौथीपर्यंत झाले असले, तरी हस्ताक्षर वाखाणण्यासारखे आहे. साधी-सुलभ भाषा, यमक व अनुप्रास अलंकार, विनयशीलता, वडीलबंधू कोंडिबा, गुरू दादूबाळा आणि श्रोते यांच्याविषयी आदर इ. वैशिष्ट्ये त्यांच्या लेखनात आढळतात. उदा. शाहिस्तेखानाची मोहीम या पोवाड्याचा शेवट करताना ते लिहितात-

*दादूबाळा गुरूची छाया । केली दया ।*
*वंदुनी पाया ।*
*कोंडीबा, कवी बावाखान जोडतो हात ।*
*माझेवर कृपा करा समस्त ।*
*दिघंची क्षेत्र माणदेशात... ॥ ४॥*

(बावाखान शेख यांचे हस्तलिखित बाड-
शाहिस्तेखानाची मोहीम)

बावाखान शाहिराचा मृत्यू १४ जुलै २००० रोजी झाला. ज्या शाहिराच्या वाणीने भेदिक कवितेचा फड गाजवला, आसमंत दुमदुमविला, त्यांना शेवटी गळ्याच्या त्रासाने वाणी बंद होऊनच मृत्यू यावा हा विलक्षण असा दुर्दैवी योगायोग म्हणावा लागेल. आजही शाहिरांची आठवण म्हणून दरवर्षी दिघंची येथे बावाखान यांची पुण्यतिथी विविध कार्यक्रमांनी साजरी केली जाते. तर करगणी येथे दरवर्षी श्रावण महिन्यात पोथीवाचन केले जाते. बाकी शाहिरांच्या काव्याची फारशी दखल कुणी घेतली नाही. शेवटी हा शाहीर उपेक्षितच राहिला. आजही अनेक हस्तलिखितांची बाडंच्या बाडं शिष्यांकडे धूळ खात पडून आहेत. ती बाडं मला वाचता आली आणि अभ्यासता आली, त्या अंती बावाखान हे फार मोठे शाहीर होते, हे मला पटले.

शाहीर बावाखान हे भेदिक शाहीर म्हणून अधिक प्रसिद्ध होते. अजूनही काही ठिकाणी भेदिक शाहिरीचे कार्यक्रम होतात. बावाखान यांचे असंख्य शिष्य ग्रामदैवताच्या यात्रेत, लोककलांच्या कार्यक्रमात, पीराचा ऊरुस, गुरुचा स्मृतिदिन यावेळी भेदिक शाहिरीच्या फंडांचे अस्तित्व जाणवते. बावाखान यांच्या भेदिक कवितेविषयी लिहायचे झाले, तर भेदिक कविता वैविध्यपूर्ण वैशिष्ट्यांनी आणि रचना कौशल्याने नटलेली आहे. अध्यात्माचा स्पर्श तर प्रत्येक कवितेला आहेच, त्याचबरोबर तुरा पक्षाचे श्रेष्ठत्वही सिद्ध केल्याचे पदोपदी जाणवते.

उदा. - 'आनंद रामायण' या भेदिक कवितेत 'दशरथ-कौशल्या' यांच्या लग्नाचे आख्यान सांगा अशी विनवणी पार्वती शंकराला करते तेव्हा शंकर हे कथानक सांगतो. कौसलराजाला दशरथ राजाने आपली कन्या राणी म्हणून स्वीकारावी असे वाटले. म्हणून आपल्या दूतामार्फत आपली इच्छा दशरथांना त्यांनी कळवली. दशरथांनी होकार कळवला. अशा प्रकारचे वर्णन आनंद रामायणामध्ये दिसून येते. ही कथा शंकर-पार्वती यांच्या संवादातून फुलवली आहे. रामायण आणि महाभारत याची सर्वांनाच गोडी असल्याने हाही प्रसंग सुरस बनला आहे. यमक अलंकारामुळे लयबद्धता आणि तालबद्धता साधली आहे. बारीकसारीक तपशीलासह कोठे विसंगती न येता गतिमानतेने ही कविता आकाराला आली आहे.

'निर्गुण फकीर' या कवितेमध्ये उत्तम नरदेहाची प्राप्ती कशाप्रकारे करून घेता येईल याचे वर्णन येते. जीवाची उत्पत्ती झाल्यानंतर तो स्वार्थी, लबाड, ढोंगी बनतो. म्हणून पुन्हा उत्तम नरदेहाची प्राप्ती करायची असेल तर एकच मार्ग आहे, असे सांगताना शाहीर म्हणतात-

*नऊ दरवाजे या मशिदीला चार चौक्या गहन ।*
*विहंगम, मीन, कपिला, पीपीलिका पहाती मन पवन ॥*

*'आनुहात डफ वाजे फकीर करती गायन ।*
*भगवंताचे घ्यावे नाम आहे रे परमार्थसाधन ।।'*

(हस्तलिखित बाड- निर्गुण फकीर)

या देहरूपी मशिदीचे नऊ दरवाजे (दोन कान, दोन नाकपुड्या, दोन डोळे, तोंड, मूत्रनलिका व गुदद्वार) यांमार्फत चार नाभी पावन करून घेणे शक्य आहे. त्यासाठी ईश्वराचे स्मरण करणे अतिशय गरजेचे आहे. त्यासाठी परमार्थ स्वीकारा असे शाहीर सांगतो. अशा प्रकारे शाहिरांनी निर्गुण फकिरामार्फत परमार्थ स्वीकारण्याचे आवाहन केले आहे. षड्विकारांमुळे माणूस कसा वागत आहे, याची उदाहरणे देत शेवटी षड्विकारांना बंधनात ठेवण्यासाठी ईश्वराचे स्मरण करा, तेव्हाच उत्तम देहप्राप्ती होईल, असा सल्ला दिला आहे.

'गुप्तधन' या कवितेत मानवी शरीरात असणाऱ्या नाभीमार्फत तुमची अवस्था स्थिर होऊन समाधी लागेल व भगवंत प्राप्तीकडे म्हणजेच आत्मरूपाकडे तुम्ही कसे जाल याचे वर्णन येते. गुरुच्या ज्ञानदानातून शिष्याने योग्य ते ज्ञान घेऊन त्या ज्ञानाचा योग्य वापर केला तरच 'गुप्तधन' सापडेल. अध्यात्माची गोडी लावण्याचे सामर्थ्य या कवितेत आहे.

'देहरूपी भोवरा' या रचनेत देह हा भोवरा आहे. मनाप्रमाणे देह वागतो आहे. तो असा वागतो आहे मात्र त्याने तसे न वागता कसे वागावे, असा दुहेरी दुवा शाहिरांनी या रचनेत साधला आहे. देहरूपी भोवऱ्याला हातामध्ये असलेल्या दोरीचे म्हणजे सप्तधातूचे तिढे मारले आहेत. हे सप्तधातू म्हणजे शरीरातील रस, रक्त, मांस, मेद, मज्जा, अस्थि, स्नायू इ. या सप्तधातूंचे तिढे मारल्यामुळे मन या देहरूपी भोवऱ्याला पाहिजे तसे फिरवायला लागले आहे. म्हणून या देहरूपी भोवऱ्याने फसू नये, प्रलोभनाला बळी पडू नये, त्यासाठी भक्ती, शांती, वैराग्य या मार्गाने जावे. म्हणून ज्ञानमार्ग स्वीकारणे गरजेचे असल्याचे शाहीर सांगतात.

अशा प्रकारे शाहीर बावाखान शेख यांनी विविधांगी विषय आणि वैशिष्ट्यपूर्ण रचना भेदिक शाहिरीतून आणि मन यांसाठी योजलेली रूपके, कूटप्रश्न, गुरु-शिष्य संवाद, तन आणि मनाचा संवाद, प्रश्न-उत्तर, काया, नाभी, षड्रिपू, औट हात, त्रिगुण, त्रिपुटी, योगशास्त्र, समाधी, देहरूपी भोवरा, लगट, अष्टावक्र गीता, अध्यात्म, बावन्न पानांचा खेळ, वासना, कर्मकांड यांसारखे गहन विषय भेदिक कवितेत येतात. प्रत्येक कवितेतील गहनतेला आध्यात्मिक स्पर्श देऊन अंधश्रद्धा, जादूटोणा, मंत्र-तंत्र यासारखा विषय, नाट्यमयता, ओवीबद्ध रचना, दृष्टान्त, यमक आणि अनुप्रासात्मक रचना, यांमुळे प्रत्येक कविता रसिकमनात घर करते. सूक्ष्म स्वरूपाची तार्किकता कवितेत आल्यामुळे कविता खऱ्या अर्थाने तुरा पक्षाची ठरते.

शाहीर म्हटलं की, पोवाडे व लावण्या रचणारा कवी असा अर्थ सर्वश्रुत आहे. याला शाहीर बावाखानही अपवाद नाहीत. त्यांनीही एकूण सहा पोवाडे लिहिले आहेत. जातीने मुस्लिम असूनही, हिंदवी स्वराज्याचे संस्थापक छत्रपती शिवाजी महाराजांच्या पराक्रमावर आधारित चार पोवाडे लिहिलेले आहेत. त्यावरोबर १९७२ साली पडलेला भयाण दुष्काळ व प्रौढ शिक्षण या विषयांवर दोन पोवाडे लिहिलेले आहेत.

शिवाजीराजांनी आदिलशहाच्या ताब्यातील चाळीस किल्ले सर केल्यानंतर आदिलशहास काळजी वाटायला लागली होती. शिवाजीचा बीमोड करण्याशिवाय पर्याय नाही; हे त्याने ओळखले. तेव्हा शिवाजीराजांना ठार मारण्याचा विडा अफझलखानाने उचलला, या विषयावरील पोवाडा शाहिरांनी लिहिला आहे.

तसेच शाहिरांनी 'बाजीप्रभू देशपांडे यांचा मृत्यू' या ऐतिहासिक पोवाड्यातून बाजीप्रभूंच्या पराक्रमाचे वर्णन केले आहे. बाजीच्या अंत:करणात भिनलेली स्वामीनिष्ठा, त्याग, समर्पण यांचा सुंदर मिलाप पोवाड्यात दिसतो. विसाव्या शतकातील निष्ठा हरपलेल्या माणसांमध्ये स्वदेशनिष्ठा निर्माण व्हावी. हाच हेतू शाहिरांचा असावा.

'शाहिस्तेखानाची मोहीम' हा पोवाडा शाहीर

बावाखान यांनी लिहिला आहे. इ.स. १६६३ मध्ये घडलेला हा प्रसंग शाहिरांनी सुरेख वर्णिलेला आहे. शिवाजीराजाने रचलेले मनसुबे कसकसे यशस्वी होत गेले, तसेच त्यांना सरदार, मावळे, किल्लेदार यांनी दिलेली साथ, भवानीमातेचा प्रसाद यामुळे विजय संपादन झाला. म्हणून शिवाजीराजा हा जनतेचा पालनकर्ता, रक्षणकर्ता आहे, असे वर्णन शाहीर यथार्थपणे करतात. खरं तर शाहिस्तेखानावरील विजय हा विषय तसा जुना असला, तरी शाहिरांच्या वर्णनशैलीचा परिणाम नव्याने जाणवतो. मुस्लिम असूनही हिंदू धर्माबद्दल व्यक्त केलेला आदर कौतुकास्पद आहे. पोवाड्याच्या भाषेत जोरकसपणा, प्रसंगवर्णनात नीटनेटकेपणा, आटोपशीरपणा, छोट्या-छोट्या शब्दांचे चरण ही लेखनवैशिष्ट्ये आढळतात.

'पुरंदरचा वेढा' या शेवटच्या ऐतिहासिक पोवाड्यात जयसिंग आणि दिलेरखान यांमधील प्रसंगाचे वर्णन येते. शिवाजीराजांनी जयसिंगाची भेट घेऊन युद्ध करण्याऐवजी शत्रुत्व सोडून तहनामा करावा, असा भवानीमातेकडून मिळालेला आशीर्वाद, या संधीचा फायदा राजाने घ्यायचे ठरवले, त्याचे वर्णन म्हणजे हा पोवाडा होय. गनिमी काव्याने शत्रूशी लढून विजयी होता येते; हे दूरदृष्टी असलेल्या शिवाजीराजाने दाखवून दिले आहे. सतराव्या शतकातील प्रसंगाचे वर्णन एकविसाव्या शतकात पोवाड्याच्या रूपाने मांडणाऱ्या शाहीर बावाखान यांची सतेज बुद्धिमत्ता आणि स्मरणशक्तीचे कौतुक करावे लागेल. अल्पशिक्षित असतानाही त्यांची लेखनशैली व भाषा बहुतांशी शुद्ध आहे. पोवाड्याची खंडित झालेली परंपरा विसाव्या शतकातही टिकून होती हे बावाखान यांच्या रचनेवरून दिसून येते.

ऐतिहासिक पोवाड्यानंतर १९७२ साली पडलेला दुष्काळ आणि प्रौढ शिक्षण यावर पोवाडा लिहिला आहे. १९७२ साली खूप दुष्काळ पडला होता. परिस्थिती खूप भयाण आणि विपरीत झाली होती. माळरान पांढरेफटक पडले होते. उपलब्ध चारा जादा दराने विकला जात होता. कोणी कोणाला मदत करत नव्हते. उपासमार, भूकबळीचे प्रकार वाढत होते. जनावरे खाटकाच्या स्वाधीन केली जात होती. याचे साक्षीदार शाहीर बावाखान होते; परंतु दुष्काळ का पडला याचे कारण शोधले आहे, यातून त्यांच्या कौशल्याची व सृजनशीलतेची जाणीव होते. दुष्काळाचे कारण सांगताना शाहीर म्हणतात–

*का घेता जनावराचा शाप, विकून कसाबाला ।।*
*कसाब सुरी घेऊन, घालतो सल्ला ।।*
*मरता मरता गाय, म्हैस देती शाप तुम्हाला ।।*
*आजवर आमच्या जीवावर, संसार केला ।।*
*मोट, नांगर हाकीले, जुंपून माझ्या पोराला ।।*
*धान्य पिकऊन जगविले, तुम्ही आमच्या बाळाला ।।*
*निर्वाणीचे वेळी तुम्ही, विकता कसे कसाबाला ।।*
*कसा पडेल पाऊस वेळेवर, शाप तुम्हाला ।।*
*पडू नको पावसा खाली, रे शपथ तुला ।।*
*न साहे पाप धरणीला आणि पावसाला ।।*
*असल्या माणसाला... ।।*
*जगवून झाला आमचा काळ.... ।।*
*म्हणून आम्ही पाडला हा दुष्काळ ।।*
*माणूस झाला दुष्ट चांडाळ ।।*

(हस्तलिखित बाड- महान दुष्काळ)

अशी नवीनता शाहिरांनी वर्णिलेली असली, तरी दुष्काळ हा थांबला पाहिजे असे त्यांना वाटते. प्रत्यक्ष आलेला अनुभव, वास्तवता, लोकांची मानसिकता त्यांनी जवळून पाहिली आहे. गोमातेच्या पवित्र स्थानावरून पशू बनवून तिच्याशी क्रूर वागणे, फसवा-फसवी, दुराचार, भ्रष्टाचार यांना ऊत येणे असे प्रकार वाढले असल्याचे स्पष्ट केले आहे. मूळ कारणाचा शोध न घेता रुढीप्रिय मानसिकतेचा शोध, दैववादाचा शोध घेत पाप, पुण्य, नशीब यांमध्ये लोक गुरफटलेले आहेत. त्यांच्यात दु:खाचा शोध शाहिरांनी घेतला आहे. परखड निवेदन, ग्राम्य शब्द योजना, सूक्ष्म वर्णन, भेसळ केलेल्या दुधाला 'चुन्याची निवळी' म्हणून दिलेली उपमा, यमक अलंकार

यांसारख्या लेखनवैशिष्ट्यांमुळे वाचकाला दुष्काळ अनुभवल्याचा भास झाल्याशिवाय राहात नाही, असे लिखाणावरून वाटते.

शाहिरांनी तत्कालीन समाजाला उपदेश देण्यासाठी 'प्रौढ शिक्षण' हा सामाजिक पोवाडा लिहिला आहे. शिक्षण घरापर्यंत आले तरी शिक्षणाचे महत्त्व समजले नव्हते. राजर्षी शाहू महाराज, म. फुले, महर्षी धोंडो केशव कर्वे, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, कर्मवीर भाऊराव पाटील या समाजसुधारकांनी शिक्षणाचे महत्त्व पटवून दिले. पण विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात शिक्षणप्रणालीकडे लोकांचे दुर्लक्ष झाले होते. अशातच 'प्रौढ शिक्षण' ही योजना सुरू झाली. हाच धागा पकडून शाहिरांनी प्रौढांना शिक्षण घेण्याचा उपदेश करणारा पोवाडा लिहून शिकण्याचे आवाहन केले आहे.

निदान वर्तमान समजून घेण्यासाठी सर्वांनी शिक्षण हे घेतलेच पाहिजे, त्यासाठी अज्ञानास दूर ठेवा, असे सांगताना अज्ञानाचे वर्णन सुरेख केले आहे. ते लिहितात-

*अज्ञानाचे गवत झाडे फार वाढली ।*
*ज्याने घेऊन ज्ञान कुऱ्हाड झाडी तोडली ।*
*विवेकाचे नांगराने जमीन निर्मळ केली ।*
*सत्त्वाचे टिपनीने बीज पेरा भूमीला ।*
*शिक्षणाचे बीज सुंदर उगवेल तनुला ।*
*याचेसाठी जाऊन सांगा शाळा मास्तराला ।*
*तुम्हासाठी बसले जागत । धरा आगत ।*
*सारे मोफत । खर्च सरकारला ॥ जीऽऽ जी ॥*

(हस्तलिखित बाड- प्रौढ शिक्षा)

अशी सुंदर उपमा वापरून सत्त्वाच्या तिफनीने बीज पेरले, तर शिक्षणाचा नवा अंकुर उगवणार आहे. यासाठी शिक्षण घ्या, असे वर्णन करून शाहिरांनी रंगतदारपणा आणला आहे.

अशा प्रकारच्या ऐतिहासिक आणि सामाजिक पोवाड्यांतून लिखाण हे सर्वस्पर्शी आहे असे दिसून येते. एवढ्यावरच त्यांची लेखणी थांबली नाही, तर विविध विषयांवर त्यांनी कटाव, गीते, ऐकीव आणि साकी छंदातील रचनाही केल्या आहेत.

'कटाव' म्हणजे आख्यान, कथागीत, कथाकाव्य असा अर्थ आहे. रंजकता, अद्‌भुतता, योगायोग, चमत्कार यांचा आधार घेऊन मानवी वृत्ती-प्रवृत्तींवर प्रकाश टाकून सामाजिक नीतिमूल्यांची जाणीव करून दिली आहे. शाहीर बाबाखान यांच्या 'सवती मत्सर' या कटावामधून सवती-सवतींमध्ये द्वेष कसा असतो, स्वभावातील विसंगती, लोभी आणि स्वार्थी भावना यांचे सविस्तर वर्णन येते. विसंगतींवर बोट ठेवून मनोरंजनातून प्रबोधन करण्याचा प्रयत्न शाहिरांनी केला आहे. त्यांच्या 'बहिणीने भावावर केलेला अत्याचार' या कटावामध्ये माणसे आपल्या स्वार्थापोटी नातीगोती विसरत चालली आहेत, आपला दुष्ट हेतू साध्य होण्यासाठी रक्ताच्या नात्यावरही सूड उगवायला निघालेली माणसे दिसायला लागली आहेत. भावाची संपत्ती गिळंकृत करण्यासाठी बहीण भावाचा खून करते, हा विषय या कटावामध्ये येतो.

'जादूचा दिवा' या कटावामध्ये माणूस आपला स्वार्थ साधून घेण्यासाठी दुसऱ्या व्यक्तीचा बळी घेण्यापर्यंत कशी धाडसी मजल मारतो याचे वर्णन येते. चीन देशातील अल्लाउद्दीन या तरुणाची ही कथा मनोरंजन आणि जादूगाराच्या माध्यमातून पुढे सरकत जाते. दातृत्वाची सवय, तत्कालीन लोकांना लागावी असेच शाहीर यातून सुचवितात.

त्यानंतरच्या 'मोहिनी जादूगार' यात पुन्हा जादूचा विषय येतो. मोहिनी जादूच्या बळावर नवऱ्याला कशी नाचवते याचे वर्णन येते. रंजकता आणि गूढता आणत आणत माणसांच्या मनात दूरदृष्टी असावी असा बोध केला आहे. प्रसंगाने व्यक्तींमध्ये सावधानता आणत कथानक ध्येयापर्यंत पोहोचते. कथानक श्रवणीय असून, उत्सुकता ताणणारे कौशल्यही शाहिरांनी साधले आहे. 'मास्तरीण' या कटावामध्ये सामाजिक नीतिमत्ता नसलेल्या तरुणाच्या मनाला कामवासनेची आणि पैशाची अभिलाषा निर्माण होते.





अनुक्रमणिका

ती पूर्ण करताना सर्व त्याच्या अंगलट कसे येते त्याची ही कथा.

अशा प्रकारे शाहीर बावाखान यांनी कटावमधून अनेक विषय हाताळले आहेत. कधी रंजक, तर कधी गंभीर घटना यांमध्ये आलेल्या दिसतात. रंजकतेच्या माध्यमातून मनोरंजन, तर गंभीर विषयांतून सामाजिक रूढीची, नीतीची शिकवण दिली आहे.

भटकंती करत असताना शाहीर बावाखान यांनी सर्वसामान्य, तळागाळातल्या लोकांचा जवळून अभ्यास केला होता. त्यामुळे अशा अडाणी आणि सर्वसामान्यांमध्ये अजूनही जागृतीची गरज आहे असे शाहिरांना वाटले. म्हणून त्यांनी समाज-प्रबोधनासाठी, जनजागृतीसाठी विविध विषयांवर अनेक गीतं लिहिली आहेत. शाहिरांनी प्रबोधनपर गीतांच्या माध्यमातून विकास योजना, जनजागृती, लोकशिक्षण, डावबाजी इ. राष्ट्रभक्तीपर गीतांच्या माध्यमातून भारतमातेची हाक, समरगीते, महाराष्ट्र, गांधींची प्रार्थना इ., उपदेशपर गीतांच्या प्रकारात संतती नियमन, मदिरा, नरजन्म, माणूस कसा असावा इ. अध्यात्मपर गीत प्रकारांत गजानन चरित्र, गुरुची स्तुती इ., तर राष्ट्रीय ऐक्यपर गीत प्रकारांत हिंदु-मुस्लिम या गीतांचा समावेश होता.

माणसाला थोडा अधिकार प्राप्त झाला किंवा एखाद्या पदावरती आरूढ झाला, तर तो माणुसकीशून्य वागतो. प्रत्येक सरकारी अधिकाऱ्याकडून गावकऱ्यांची फसवणूक केली जाते. यात कशी फसगत होते, याचे वर्णन 'डावबाजी' या गीतात आढळते ते असे-

*सोसायटीचा चेअरमन दोस्त ।*
*धान्य साखर असते स्वत ।*
*नुस्तच म्हणतो साखर देतो ।*
*पण गिऱ्हाईक मागच्या दारी ।*
*कशाला माया वरच्या वरी ॥३॥*
*बायको म्हणते साखर आणा ।*
*कार्ड न्या तुम्ही, झाला महिना ।*
*बारीत घुसला दिवस गेला ।*
*साखर नाही घरी ।*
*कशाला माया वरच्या वरी ॥४॥*

(हस्तलिखित बाड – डावबाजी)

सोसायटी म्हणजे 'राशन' दुकान. सर्वसामान्यांना दुकानाचा चेअरमन ओळखीचा असूनही कसा फसवतो आहे, याचे वर्णन येते. ग्रामीण भागातील लोकांना सरकारी योजना कळत नसतात, कळतात तेव्हा उशीर झालेला असतो. यामुळे लोकांना कुटुंब नियोजनाचे महत्त्व कळले नाही. त्यामुळे लोकसंख्या वाढते आणि घरातील प्रगती खुंटते. यावर 'संतती नियमन' नावाचं गीत लिहिलं आहे.

अशा प्रकारे शाहीर बावाखान यांनी जनजागृती आणि प्रबोधन करण्यासाठी प्रामुख्याने ही गीते लिहिली आहेत. गरीब, अज्ञानी, सर्वसामान्य लोकांना वेगवेगळ्या प्रकारचे प्रबोधन केले आहे. देशभक्ती, व्यसनमुक्ती, कुटुंबनियोजन, परमार्थ आणि हिंदू-मुस्लिम ऐक्य असे अनेक विषय हाताळत प्रबोधन केले आहे.

शाहिरांनी 'ऐकीव' हा काव्यप्रकारही हाताळला आहे. भेदिक शाहिरी फड गाजवत असताना रंजन आणि उद्‌बोधन करणे तसेच अध्यात्माबरोबर विरंगुळाही व्हावा या हेतूने 'ऐकीव' ची रचना केली आहे. भेदिक फडामध्ये काही दीर्घ कथात्मक रचना मौखिक रूपाने साभिनय सादर केली जाते, अशा रचनांना 'ऐकीव' असे म्हणतात. या 'ऐकीव'मधून शाहिरांनी दुसऱ्याची निंदा करू नये, प्रसंगावधानता राखून कार्य करावे, संकटाचा सामना करावा, सज्जनाने प्रामाणिकपणा सोडू नये, उलट दुर्जनास बोध देऊन सज्जन बनवावे, सत्संगाची कास धरावी, असा बोध केला आहे.

बावाखान शेख यांनी 'कटाव', 'ऐकीव' याबरोबरच 'साकी' या प्राकृत छंदातदेखील रचना केली आहे. 'साकी' या छंद-प्रकारात दोन चरण किंवा अर्धे असून, प्रत्येक चरणात किंवा अर्धात २८ मात्रा असतात. शाहिरांच्या या रचनेत वैविध्य आढळते. सध्या हा लेखनप्रकार सहसा आढळत



अनुक्रमणिका

नाही. शाहिरांनी यामध्ये संसाराचे वर्णन करताना मायारूपी संसाराला बाजूला ठेवून घडामोडी सद्‌गुरूचे स्मरण आणि परमेश्वराचे नामस्मरण करा; असा सल्ला दिला आहे. त्याचबरोबर फुशारकी मारणाऱ्या लटक्या कवीवर शाहिरांनी प्रहार ओढला आहे. पुढे अहंकारी पुरुषाचे वर्णन एका 'साकी'त शाहिरांनी केले आहे. अहंकार सोडून द्यावा, असे लिहिताना शाहीर म्हणतात–

*नरा करा जरा थारा जिवाशी, अहंभाव सोडा ।*
*करा धरा गुरू वरा, षड्‌रिपू घाला पाय खोडा ।*
*काळ टाळ चांडाळ व्याळ, सद्‌गुरू पद जोडा ।*
*तन मन धन पदी ध्यान, बावाखान गुरुपदी वेडा ।*
(हस्तलिखित बाड – साकी)

'शब्द थोडे अर्थ फार' या उक्तीप्रमाणे शाहिरांनी मायारूपी संसार, अहंकारी स्वभाव, गुरूंचा विसर, विठ्ठलाचे महत्त्व यांसारखे विषय 'साकी' रचनेत आणले आहेत. यमक, उपमा, अनुप्रासयुक्त रचना ही वैशिष्ट्ये आढळतात.

अशा रीतीने माणदेशातील अल्पशिक्षित, भटकंती करणाऱ्या शाहीर बावाखान शेख यांनी आपल्या शाहिरी काव्यातून सर्वस्पर्शी लेखन केले आहे. भेदिक कविता, पोवाडे, कटाव, ऐकीव, गीते आणि साकी आदी प्रकारांत विपुल लेखन केले आहे. आजही त्यांचे शिष्य गुरूंच्या कविता भेदिक फडात सादर करतात, आणि फड जिंकतात. असा हा शाहीर बावाखान दरवेशी माणदेशाच्या मातीत मुरलेला, तत्कालीन परिस्थितीला अनुसरून जेवढ्या खोलवर रुजवता येईल तेवढ्या पद्धतीने रुजवण्याचा प्रयत्न करणारा, माणदेशातील साहित्यिकांची परंपरा समृद्ध करणारा नामानिराळाच म्हणावा लागेल.

त्यांचे प्रत्येक काव्य हे मराठी साहित्याचे अनमोल लेणे ठरू शकते. सवाल-जवाबाच्या माध्यमातून कूटप्रश्नांचा उलगडा करीत लोकांना विशेष गोडी लावण्याचे सामर्थ्य त्यांच्या कवितेत आहे. त्यांनी ग्रामीण भागातील तुरेवाले शाहीर म्हणून नाव कमावले होते, ते त्यांच्या सतेज बुद्धिमत्तेमुळे, कौशल्यामुळे. अल्पसंख्यांक, गरीब, अप्रकाशित व उपेक्षित असणाऱ्या शाहिरांचे काव्य विविध प्रकारांत 'हस्तलिखित बाड' उपलब्ध आहे. त्यानुसार 'पोवाडा' या खंडित झालेल्या काव्यप्रकाराची पुन्हा नव्याने ओळख झाली, तर 'कटाव, 'ऐकीव' आणि 'साकी' सारखे जुने छंद प्रकार, जे मराठी साहित्यात सद्यस्थितीत कालबाह्य झाले आहेत. तसेच शाहिरांच्या लेखणीतून अध्यात्म, परमार्थ, परमात्मा, नामस्मरण, प्रबोधन, राष्ट्रभक्ती, स्वामीनिष्ठा, स्वराज्यनिष्ठा, योगशास्त्र, व्यक्तिमत्त्व विकास, राष्ट्रीय ऐक्य याशिवाय दुसरे विषय येत नाहीत. म्हणजे अंधश्रद्धा, आत्मस्तुती, व्यक्तिपूजा यांसारख्या विषयांना त्यांच्या साहित्यात स्थान दिले नाही, हे विशेष. प्रबोधन करणे आणि अध्यात्माची गोडी लावणे या वैशिष्ट्यांमुळेच आजही त्यांची शाहिरी, त्यांचे शिष्यगण खेड्यापाड्यांत पोहोचवतात. मराठी साहित्य दरबारात माणदेशातील कवी, शाहीर म्हणून बावाखान शेख यांच्या काव्याची रुजवात व्हावी, न्याय मिळावा, उपेक्षित कवी प्रकाशात यावा, असे मला वाटते.

**संदर्भ :**


१) शाहीर बावाखान शेख यांच्या पत्नी बायमाबी व तीन मुली यांच्याकडून मिळविलेली मौखिक माहिती.

२) शाहीर बावाखान यांचे चुलतबंधू दादाभाई शेख (खडकी, ता. मंगळवेढा) व पट्टशिष्य जयवंत रणदिवे (दिघंची, ता. आटपाडी) यांच्याकडून मिळविलेली व्यक्तिमत्त्वाविषयी माहिती आणि हस्तलिखित बाडे व वह्या.


◇◇◇


**प्रा. जवाहर लक्ष्मण मोरे**
एम.ए.बी.एड., नेट., एम.फील.
संतोष भीमराव पाटील महाविद्यालय, मंद्रुप,
ता. द. सोलापूर, जि. सोलापूर.
भ्रमणभाष : ९४२१०२४९७९/९६६५९११४९७९

# संत संताजी जगनाडे : चरित्र आणि घाण्यावरील अभंग

— डॉ. फुला बागुल

*[तुकोबांच्या टाळकऱ्यांपैकी, तुकोबारायांचा सहवास लाभलेले, एक संत संताजी जगनाडे, हे तेली समाजात जन्माला आले. व्यवसायाने तेली असल्याने त्यांच्या 'घाण्यावरच्या अभंगात' आपल्या व्यवसायातील शब्दरचना स्वाभाविकपणे प्रकटली आहे. अठरापगड जातींतील संतांनी केवळ भक्ती हाच आपला धर्म मानला. संताजीही त्याला अपवाद नाहीत. संतांजींचे बहुमोलाचे कार्य असे की, त्यांनी तुकोबांच्या नष्ट केलेल्या गाथा जागोजागी जाऊन गोळा केल्या. खऱ्या अर्थाने लोकगंगेतून मोठ्या कष्टाने जमा करून तारल्या! संतांजींचे हे कार्य म्हणजे संतपीठावर मोठे उपकारच आहेत. त्यांच्या चरित्र आणि घाण्यावरच्या अभंगांचे हे पुन:स्मरण! — संपादक]*

जगद्‌गुरू संत तुकाराम यांच्या चौदा टाळकऱ्यांपैकी एक असलेले; स्वत:ची विपुल अभंगनिर्मिती असलेले तेली जातीतील संत संताजी जगनाडे यांची अभ्यासकांकडून विशेषत्वाने दखल घेतली गेली नाही. इंद्रायणीत बुडविण्यात आलेली तुकारामांची गाथा 'तरली' या विधानाचा एक अर्थ लावला जातो. संताजी जगनाडे यांना दीर्घकाळ तुकारामांचा सहवास लाभला होता. त्यांची स्वत:ची स्मरणशक्ती उत्तम होती. त्यांना उत्तम अक्षरज्ञान होते. तुकारामांचे जे अभंग त्यांनी टाळकरी म्हणून स्वत: गायिले होते ते त्यांनी पुन्हा नव्याने लिहून काढले. शिवाय तुकारामांनी देहू आणि जवळच्या परिसरात वेळोवेळी कीर्तनांतून ज्या अभंगांचे निरूपण केले; जे अभंग वारकऱ्यांना मुखोद्‌गत होते; ते अभंग पायपीट करून संताजी जगनाडे यांनी पुन्हा मिळविले. या अर्थाने लोकइंद्रायणीत तुकारामगाथा तरली. संताजींच्या या सर्व धडपडीमागे अर्थातच संत तुकारामनिष्ठा व पर्यायाने विठ्ठल निष्ठा होती. नंतरच्या काळात मोगली आक्रमकांपासून संत तुकारामगाथांचे संरक्षण जीवावर उदार होऊन संताजींनी केले. मे इ.स. १६६० मध्ये शाहिस्तेखानाच्या सैन्याने पुणे, चाकण परिसरात घरादारांच्या होळ्या केल्या, त्याप्रसंगी संत तुकारामगाथा पाठीवर घेऊन जंगल, ऊन, वारा यांची तमा न बाळगता पादक्रमण करून संताजींनी गवरशेठ यांच्याकडे तुकारामगाथा सुखरूप पोहोचवली. या प्रसंगी गवरशेठ (संत तुकाराम शिष्य) संताजींना म्हणाले, "संतू, अरे केवढं मोठं काम केलंस? तुझ्यामुळे या वह्या वाचल्या."[१]

याखेरीज डिसेंबर इ.स. १६७१ मध्ये पुन्हा दिलेरखानाचे संकट पुण्यावर ओढवले. चाकणवरही दिलेरखानाच्या सैन्याची धाड पाडून तुकारामगाथांचे काही बरेवाईट होईल; ही शक्यता लक्षात घेऊन संताजींनी पुन्हा गाथा पाठीवर घेऊन सदुंबऱ्याला प्रयाण करून गाथेचे रक्षण केले. पायी प्रवासातल्या हालअपेष्टा भोगल्या.

संताजींना दिलेल्या पूर्ववचनानुसार वैकुंठी गेलेले तुकाराम पुन्हा संताजींच्या अंत्यसमयी प्रकट झाले. या प्रसंगाचे वर्णन करताना श्री. देशपांडे लिहितात, "त्यावेळी तुकोबा आले. त्यांनी संतूचे देहावर तीन मुठी माती टाकली. त्यांचे शिरकमल पूर्ण झाकले गेले."[२]

संताजी जगनाडे यांची कन्या भागीरथी हिनेही पित्याचा वारसा पुढे चालवला. ती सुद्धा विठ्ठलभक्त होती. तिची स्वत:ची अभंगनिर्मिती आहे. दुर्दैवाने अभ्यासकांना त्याची माहिती नाही. तिचा एक अभंग श्री. देशपांडे यांनी दिला आहे.[३]

संताजी जगनाडे यांनी 'घाण्यावरील अभंग',

'शंकर दीपिका', 'निर्गुणाच्या लावण्या', 'योगाची वाट', 'तैलसिंधू' भजने व कवने अशी विपुल काव्यनिर्मिती केली आहे. प्रख्यात संशोधक रा.चिं. ढेरे यांनी 'संताजी जगनाडे यांच्या चरित्र आणि साहित्याबाबत निखळ सत्यशोधनाची' अपेक्षा व्यक्त केली आहे. ते म्हणतात, 'संताजीमहाराजांच्या चरित्रातून सामूहिक अस्मिता प्राप्त करणाऱ्या तेली समाजाने आजवर संताजी महाराजांच्या चरित्राची सामग्री एकत्र करण्याचा आणि त्यांची अभंगरचना मिळविण्याचा प्रयत्न पुन: पुन्हा चालू ठेवला असला तरी, चार-दोन लीलाकथांपलीकडे अशी सामग्री हाती आलेली नाही; आणि अभंगरचना एकत्रित करण्याच्या प्रयत्नाला नि:शंक यश प्राप्त होऊ शकले नाही. या समाजाबाहेर, संशोधनदृष्टीने संताजीमहाराजांच्या चरित्राचा आणि वाणीचा शोध घेऊ पाहणाऱ्या अभ्यासकांत दोन टोके आढळतात. संताजीमहाराज हे तुकोबांच्या परिवारात वावरणारे, त्यांची अभंगरचना त्यांच्या हयातीतच संग्रहित करणारे त्यांचे साक्षेपी अनुयायी होते. त्यांच्या चौदा टाळकऱ्यांपैकी एक होते, असे मानणारा एक पक्ष आणि संताजीमहाराजांनी आणि त्यांच्या घराण्यातील पुढिलांनी तुकोबांची वाणी संग्रहित केली असली, तरी त्यांनी केलेले हे मोलाचे कार्य तुकोबांच्या वैकुंठगमनानंतरचे आहे, असे मानणारा दुसरा पक्ष. या दुसऱ्या पक्षाच्या म्हणण्यानुसार संताजीमहाराजांचा जन्मही तुकोबांच्या वैकुंठगमनानंतर एक वर्षाने झालेला आहे; आणि त्यांच्या नावावरील अभंगरचनाही उत्तरकालीन आख्यानरचना आहे. या दोन टोकांच्या मतात सत्य नेमके कुठे आहे, याचा निर्णय सध्याच्या उपलब्ध साधनांच्या आधारे करणे सोपे नाही. तो दीर्घकालीन संशोधनाचा विषय आहे.[४]

रा. चिं. ढेरे यांनी प्रतिपादित केलेल्या वरील दोन्ही टोकाच्या अभ्यासकांनी 'तुकोबांची वाणी संताजींनी संग्रहित केली' हे निर्विवाद मान्य केले. राहिला प्रश्न तो संताजींच्या नावावर असलेल्या रचनेचा. ढेरेंच्या प्रतिपादनातील दुसऱ्या पक्षाच्या अभ्यासकांनी ही रचना उत्तरकालीन आख्यानरचना असल्याचे म्हटले आहे. प्रस्तुत निबंधात मर्यादा म्हणून फक्त त्यांच्या घाण्यावरील अभंगाची चर्चा करून ती आख्यानरचना ठरते की नाही, तसेच ती त्यांची स्वनिर्मिती ठरते की नाही याचा वेध घेण्याचा प्रयत्न आहे.

'संत संताजी जगनाडे' चरित्राचे लेखक श्री. शशिकांत देशपांडे यांनी संताजी चरित्रासंबंधीने त्यांच्या वंशावळीबद्दल पुढील माहिती दिली आहे.

चाकण (मूळ स्थान)
|
भिवा-शेठ जगनाडे — गिरीजाबाई (दोघेही पांडुरंग भक्त तेलघाणीवरून तेल काढणे, विकणे हा व्यवसाय)
|
विठ्ठल जगनाडे — मथाबाई काळे (सदुंबरे)
|
संताजी जगनाडे — यमुनाबाई कहाणे (खेड)
(जन्म १६२४
मृत्यू १७००)
|
बाळोजी     भागुबाई

संत संताजी जगनाडे रचित घाण्यावरील अभंगाची वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे स्पष्ट करता येतात.

**जातिभेदास नकार :**

आपले परमगुरू संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांप्रमाणे संत संताजी जगनाडे यांनीही जातिअंताची भूमिका घेतल्याचे त्यांच्या स्वनिर्मित अभंगांतून प्रत्ययास येते. मनुष्य सर्वत्र समान आहेच, कुणीही नीच अथवा कनिष्ठ नाही, ही समतेची ग्वाही सर्वच संतांनी दिलेली आहे. अशी समतेची म्हणजेच जातिअंताची आग्रही भूमिका आख्यानकाव्यात आढळत नाही.

संताजींच्या अभंगात ही भूमिका असल्याने संताजींची अभंगरचना संतकाव्य समकालीन ठरते. तिला आख्यानरचना मुळीच म्हणता येणार नाही. समकालीन संत तुकारामांचा सहवास, तुकारामांच्या समता दृष्टीचा झालेला संस्कार यामुळे आपल्या अभंगात संताजींनीही त्याच समतेचा पुरस्कार करून जातिभेदास नाकारले. घाण्यावरील अभंगात संताजी म्हणतात –

*'सगुण हा घाणा घेऊनि बैसलो ।*
*तेली जन्मा आलो घाणा घ्याया ॥*
*नाही तर तुमची आमची एक जात ।*
*कमी नाही त्यात आणु रेणु ।*
*संतु म्हणे जाती दोनच त्या आहे ।*
*स्त्री आणि पुरुष शोधुनिया पाहे' ॥९॥*

माणसांच्या शेकडो जाती न मानता निसर्गत:च दोन भिन्नलिंगी जाती (स्त्री आणि पुरुष) आढळतात, त्यांचाच उल्लेख संताजी येथे करतात. सर्व पुरुष-पुरुष म्हणून, सर्व स्त्रिया-स्त्रिया म्हणून समान आहेत. अणुरेणुइतकाही भेद त्यांच्यात नाही. तेली जातीत जन्मलो म्हणून तेली, ही जन्माधिष्ठित जात कल्पना जशी तुकारामांना मान्य नाही, तशीच ती संत संताजींनाही मान्य नाही. म्हणून संत संताजी हे संत काव्यपरंपरेतील ठरतात, आख्यान कवी परंपरेतील नव्हे.

**व्यवसायाशी निगडित 'बोली' शब्दांची योजना :**

समाजातील विविध व्यावसायिक आपापल्या व्यवसायक्षेत्रात जी विशिष्ट बोली बोलतात, तिला व्यावसायिकांची बोली (Registered dilects) असे म्हटले जाते. संत जगनाडे यांच्या 'घाण्यावरील अभंग' या रचनेत तेलनिर्मिती या व्यवसायातील अनेक शब्द येतात. हे व्यवसायनिष्ठ शब्द प्रतीकांच्या रूपात येतात आणि अर्थातच त्यामुळे आशय अधिक समृद्ध होतो. पुढील अभंगावरून ते पुरेसे स्पष्ट होईल –

*आमुचा तो घाणा त्रिगुण तिळाचा ।*
*नंदी जोडियला मन पवनाचा ।*
*भक्ति हो भावाची लाट टाकियली ।*
*शांती शिळा ठेवली विवेकावरी ॥*
*सुबुद्धीची वढ लावोनी विवेकास ।*
*प्रपंच जोखड खांदी घेतीयले ॥*
*फेरे फिरो दिले जन्मवरी ।*
*तेल काढियले चैतन्य ते ॥*
*संतु म्हणे मी तेल काढियले ।*
*म्हणुनी नांव दिले संतु तेली ॥१०॥*

अभंगात अनुक्रमे घाणा, तीळ, नंदी, लाट, शिळा, वढ, जोखड, तेल हे व्यवसायनिष्ठ शब्द आहेत, ते प्रतीकरूप आहेत.

*देह क्षेत्र घाणा ऐका त्याच्या खुणा ।*
*गुदस्थान जाणा उखळते ॥*
*स्वाधिष्ठानावरी मन पुरचक्र ।*
*विंदु दंत चक्र आनु हात ॥११॥*

या अभंगात घाणा, उखळ हे व्यवसायनिष्ठ शब्द आहेत.

*आशा, मनशा, तृषा, माया पाचरी चारी आणून ।*
*दुर्गतीचा खील त्यांमधी दीला ठोकून ॥१६॥*

याशिवाय,

*मनोभक्तीची करुनी ळाठ ।*
*गुरुकृपेचा बसविला कठ ॥*
*अशी ही संतु तेल्याची लाट ।*
*काळकाळाची . . . .फाट ॥२१॥*

या दोन्ही अभंगांत पाचरी, खील, लाट, कठ हे व्यवसायनिष्ठ शब्द संताजी जगनाडे यांनी योजले आहेत.

व्यवसायनिष्ठ शब्दांच्या योजनेमुळे पुढील दोन गोष्टी स्पष्ट होतात –

१) संताजींच्या नावे असलेली रचना ही संताजींचीच आहे. तेलघाण्यावर बसून ते स्वत: तेल काढीत. यामुळेच त्यांनी व्यवसायनिष्ठ शब्दांची योजना केली.
२) संताजींच्या नावे असलेली रचना ही आख्यानरचनेसारखी मुळीच नाही. संताजींच्या

अभंगांचे श्रेय उत्तरकालीन पंडित कवींना देऊ नये. पंडित कवींच्या आख्यानरचनेत व्यवसायनिष्ठ शब्द येत नाहीत.

**लोकशिक्षकाची भूमिका :**

संताजी जगनाडे यांनी संत तुकारामांप्रमाणेच सभोवतालच्या ऐहिक सुखाच्या नादी लागलेल्या समाजाला काहीएक उपदेश केला आहे. यामागे संताजी जगनाडे यांची भूमिकाही संत तुकारामांप्रमाणेच 'सर्व जणांची आत्मोन्नती' हीच आहे. लोकशिक्षणाच्या उदात्त हेतूने संताजी जगनाडे यांनी घाण्यावरील अभंग रचिले आहेत. ते म्हणतात –

*'मन हे ओढाळ गुरु फार आहे ।*
*परधन पर कामिनीकडे धावे ॥*
*असेच हे मन राहिना हो स्थिर ।*
*नेहमी हुरहुर लागली असे ॥*
*संतु म्हणे मन करा तुम्ही स्थिर ।*
*राऊळा अंगणी जाऊनिया' ॥६८॥*

मानवी मनाच्या चंचलतेवर मंदिर हा उपाय लोकशिक्षणाच्या हेतूने त्यांनी येथे सुचविला आहे. सामान्य माणसाचे अस्थिर मन ही सामूहिक समस्या त्यांनी ओळखली आहे.

*जन्मोनिया इहलोकी काय केले ।*
*पुष्कळच ते धन मिळविले ॥*
*आणिक मिळविले वतनवाडीशी ।*
*रांडा आणि पोरा आवघ्याशी ॥*
*संतु म्हणे तुम्ही मागे ते सरावे ।*
*मरावे परी किर्तीरुपे उरावे ॥६३॥*

ईश्वरकृपेने लाभलेल्या मनुष्यदेहाचे सार्थक काय केले? हा तळमळीचा प्रश्न ते विचारतात. ऐहिक समृद्धीसाठी जर मनुष्यदेहाचा वापर केला असेल तर ते जीवन व्यर्थ गेले, हा भाव व्यक्त करून ते जनांना उपदेश करतात की, कीर्ती शिल्लक राहील असे कार्य करा. त्यासाठी या मनुष्यजन्माचा सदुपयोग करा. तुकारामांनीही 'प्रसविती रांडा पोरा' असे म्हणत जनांची कानउघाडणी केली आहे. तेव्हा या विवेचनातून असे स्पष्ट होते की, संताजी जगनाडे हे तुकारामांचे समकालीनच आहेत. त्यांची रचना ही संतकुलीनच आहे. त्यांची रचना आख्यान कवितेसारखी नाही. आख्यानकवी लोकशिक्षणाच्या तळमळीतून काव्य रचित नाहीत.

संत तुकाराम आणि संताजी जगनाडे यांच्यातील परस्परप्रीतीचा एक दाखला तुकारामांचे वंशज गोपाळबाबा यांच्या दैनंदिनीत अभंगरूपाने असा मिळतो–

*'संताजी तेली बहुत प्रेमळ*
*अभंग लिहित बैसे जवळ*
*धन्य त्याचे भाग्य सबळ*
*संग सर्वकाळ तुकयाचा' ॥*

संत तुकाराम आणि संत संताजी जगनाडे हे समकालीन असल्याचे या अभंगातूनही मान्य करण्यात आले आहे.

**जन्ममृत्युविषयक चिंतन :**

संतकाव्यात जन्ममृत्युविषयक चिंतन प्रकट झाले आहे. मृत्यूचे स्वागत आणि जन्माचे सार्थक या भूमिकेतून संत स्वजीवनाकडे पाहतात. संताजी जगनाडे यांनीही आपल्या रचनेतून हे चिंतन मांडले आहे. ते म्हणतात –

*'सावध व्हा रे माझ्या जातीच्या तेल्यांनो ।*
*आवघ्या जनांनो सावध व्हा रे ॥*
*काळाचिये उडी पडेल बा जेव्हा ।*
*सोडविना तेव्हा माय बाप ।*
*संतु म्हणे सावध कोण झाला ।*
*देहासहित गेला तुकावानी' ॥६६॥*

मृत्यू अटळ आहे. तो कोणत्याही क्षणी येईल. त्याला सामोरे जा. त्याशिवाय पर्याय नाही. मृत्यूच्या तावडीतून कुणीही सोडवणार नाही. तेव्हा मृत्यूपर्यंतच्या जीवनात सावध व्हा. त्या जीवनाचा सदुपयोग ज्या पद्धतीने संत तुकारामांनी पुण्यप्राप्ती, परोपकार,



अनुक्रमणिका

लोकोद्धार, ईश्वरभक्ती यांसाठी केला तसाच तो लोकांनीही करावा. तसे केले तरच सदेह वैकुंठगमनाचे तुम्ही अधिकारी होणार, हे चिंतन संताजी जगनाडे येथे व्यक्त करतात.

**मोक्षाची आस :**

संतकाव्यातून 'मोक्षाची आस' हे प्राणतत्त्व प्रकट झाले आहे. मनुष्यदेहाचे 'मोक्षप्राप्ती' हेच साध्य आहे, हा विचार संतकाव्यातून प्रामुख्याने मांडला गेला आहे. संताजी जगनाडे लिहितात –

*'असाच हा जन्म पाठीमागा गेला ।*
*पुन्हा नाही आला कदा काळी ।।*
*संतु म्हणे वनमाळी ।*
*चुकवा जन्माची हे पाळी' ।।८।।*

एकदा हा मनुष्यजन्म जगून संपला की, तो पुन्हा येणार नाही. हातातला काळ संपला की तो पुन्हा नाही येणार. तेव्हा हे वनमाळी! आम्हाला जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून बाहेर काढ, 'पुन्हा नको गर्भवास' हा तुकारामांचाच विचार संताजींनी येथे मांडला आहे.

*'जन्म व्यर्थ जातो हा घाणा नेणता ।*
*काय तुज आता सांगू वर्म ।।*
*किंचित तो अर्थ जरी भरे मना ।*
*मग त्याच्या ज्ञाना पार काय ।।*
*यमाच्या घरची जाचनी चुकली ।*
*मूळ भेदी खोली उंच पहा ।।*
*संतु म्हणे मी तो देहीच पाहीलें ।*
*पुढील चुकविले गर्भवास' ।।८५।।*

तेलाचा घाणा चालविण्यात जन्म वाया जाऊ नये ही संताजींची तळमळ होती. मानवी जीवनाचा हेतू कळला तरी ज्ञानात भर पडेल. मोक्ष हीच मानवी जीवनाची साफल्यता असेल, तर यमाच्या त्रासातून मुक्तता होईल. हे सर्व मी (संताजी) संत तुकारामांच्या सान्निध्यात व विठ्ठलभक्तीत रममाण होऊन याचि देही अनुभवले आहे. आता पुढे आम्हाला जन्म नाही आणि म्हणून मृत्यूही नाही. जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून सुटका म्हणजेच मोक्ष हा विचार संताजींनी मांडला आहे. इतर संतांप्रमाणेच संताजीही जीवनाच्या हेतूकडे पाहतात, म्हणूनही ते संतकवी ठरतात.

**तत्त्वज्ञानाचे स्वरूप :**

संत संताजी जगनाडे यांनी 'घाण्यावरील अभंग' या रचनेतून आध्यात्मिक तत्त्वज्ञान सांगितले आहे. हे तत्त्वज्ञान प्रतीकरूप आहे. दैनंदिन जीवनात त्यांचा तेलघाणीशी संबंध येत असे. तेलनिर्मितीच्या व्यवसायाशी निगडित वस्तू प्रतीक म्हणून त्यांच्या अभंगात सहजपणे येतात. आत्यंतिक समर्पक अशी ही प्रतीके आहेत.

*'आमुचा तो घाणा त्रिगुण तिळाचा ।*
*नंदी जोडियला मन पवनाचा*
*भक्ति हो भावाची लाट टाकियली ।*
*शांती शिळा ठेवली विवेकावरी ।।*
*सुबुद्धीची वढ लावोनी विवेकास ।*
*प्रपंच जोखड खांदी घेतीयले ।।*
*फेरे फिरो दिले जन्मवरी ।*
*तेल काढियले चैतन्य ते' ।।१०।।*

तेलघाणीवर तेलबिया चरकात टाकल्या जातात. तेलघाणीचा बैल गोलाकार असा ठराविक चाकोरीत फिरतो. त्याच्याने बिया पिळल्या जाऊन तेल काढले जाते. ही तेलघाणी व तिच्याशी संबंधित अशा तीळ, नंदी, लाट, शिळा, वढ, जोखड, फेरे या गोष्टी अथवा वस्तू प्रतीक म्हणून येथे आल्या आहेत. शरीररूपी घाण्यात जो तीळ टाकायचा तो त्रिगुणात्मक हवा. वाऱ्यासारख्या चंचल मनाला नियंत्रित करण्यासाठी 'नंदी' जोडला म्हणजे त्याची चाल गोलाकार व ठराविक चाकोरीचीच ठेवली. घाण्याचा बैल ती चाकोरी सोडून इतरत्र जाऊच शकत नाही. मनाला असेच नियंत्रित ठेवायचे असते. भक्तिभावनेची लाट (घाण्याच्या उखळात टाकलेली, बिया पिळण्यासाठी

असलेली लाकडी लाट) घाण्यात म्हणजे शरीरात टाकली पाहिजे. बियांचे चर्वण चांगले व्हावे म्हणून वजनदार अशी शिळा (दगड) त्या लाकडी लाटेवर ठेवतात. तेलघाण्यारूपी शरीरातील मन आणि विचार भक्तिभावपूर्ण व संयमी (शांत) असावेत तरच चिंतन चांगले होईल. विवेकाला वढ (घाण्याच्या बैलास बांधलेली दोरी) लावावी ती सुबुद्धीची. प्रपंचाचा हा गाडा ओढायचा हे तर प्रत्येकाच्याच नशिबी आलेले आहे. पण प्रपंचात राहूनही मनाला भटकू न देणे, त्याला ईशचिंतनात बांधून ठेवणे, भक्तिमार्गावर चालण्यासाठी मनाला संस्कारित करणे, मन संयमित ठेवणे, विवेक आणि सद्बुद्धीची कास न सोडणे, अशा नियंत्रित फेऱ्यातून फिरत फिरत चैतन्याचे तेल काढावे, मनुष्यदेह पुण्यप्राप्तीसाठी झिजवावा, असे तत्त्वज्ञान प्रतीकांच्या माध्यमातून संत संताजींनी मांडले आहे.

*'देह क्षेत्र घाणा ऐका त्याच्या खुणा ।*
*गुदस्थळ जाणा उखळ ते ॥*
*एकविस मनी खांब जो रोविला ।*
*सुतार तो भला विश्वकर्मा ॥*
*मनाशी जुंपले फेरे खाऊ दिले ।*
*तेल हाता आले सुटे मना ।*
*संतु म्हणे माझा घाणा हो देहांत ।*
*चालवि आपोआप पांडुरंग ॥'*

देहरूपी तेलघाणीचे गुदस्थळ हे उखळ आहे. या उखळातून तिळाची ढेप (निरुपयोगी) बाहेर टाकली जाते. टाकाऊ ते टाकण्यासाठी व आवश्यक असे तेल काढण्यासाठी तेलघाणीच्या चरकात जो लाकडी खांब असतो तो एकवीस मनाचा असा वजनदार असतो. परमेश्वररूपी सुताराने, विश्वकर्म्याने ही घाण्याची म्हणजे शरीराची रचना केली. जीवनसत्त्वे शोषून घेणे, टाकाऊ ते बाहेर टाकणे हे कार्य अव्याहतपणे करणारी शरीरयंत्रणा त्या विश्वकर्म्यानेच बनविली. मनरूपी नंदी जोडल्यावर तेल हाती येईल. मनाला नियंत्रित केल्याने चांगले आचारविचार घडतील. माझे हे घाणारूपी शरीर तो परमेश्वरच चालवीत आहे.

*'आशा, मनशा, तृषा, माया पाचरी चारी आणून ।*
*दुर्गतीचा खील त्यामधी दिला टोकून*
*संत म्हणू ह्या घाण्याच्या पाचरी ।*
*जगभुलव्या नारी खऱ्याच ह्या ॥*
*भुलविले ह्यांनी भस्मासूर दैत्याशी ।*
*आणिक नारदाशी त्याच रीती*
*ब्रह्मदेवा आणि विश्वाहीमित्राशी ।*
*तसेच भुलविले इंद्रा आणि चंद्राशी*
*संतु म्हणे अशा ह्या घाण्याच्या पाचरी ।*
*काढाव्या वेगशी देहातूनी' ॥१६॥*

आशा, मनीषा, तृष्णा आणि माया या षड्रिपूरूपी पाचरींनी देहरूपी घाण्याचे चलनवलनच थांबवले आहे. या पाचरींमुळे दुर्गतीच होणार. पुराणातील देवदैत्यांनाही या पाचरींमुळेच अधोगतीस जावे लागले. या जगभुलव्या, जगबुडव्या नारींना (पाचरींना) देहमनातून वेगाने काढून टाकले तर देहरूपी घाणा, आयुष्यरूपी घाणा सुरळीत चालू राहील. दैनंदिन जीवनातील दाखले, दृष्टांत, प्रतिमा आणि प्रतीके यांची योजना करण्याची कविवृत्ती ही संतवाङ्मयात आढळते. म्हणून संताजी जगनाडे यांची ही रचना



**अभिनंदन!**

सांगली जिल्हा-प्रतिनिधी

(२०११ ते २०१६)

**सौ. वृषाली आफळे**

महाराष्ट्र साहित्य परिषद, (जिल्हा सांगलीच्या) प्रतिनिधी, शाखा इस्लामपूर ह्या नुकत्याच झालेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पंचवार्षिक निवडणुकीत सांगली जिल्हा प्रतिनिधी म्हणून बिनविरोध निवडून आल्या आहेत. गेल्या अंकात तांत्रिक कारणाने हा उल्लेख राहून गेला होता.

संपादक आणि प्रकाशक, म. सा. पत्रिका, पुणे.





अनुक्रमणिका

संतरचना ठरते.

*'कातरीने कातरला दुष्टाचा तो गळा ।*
*सावळ्याचा मळा सांभाळला ।*
*कातरीने कातरला रावणाचा मळा ।*
*लंकेचा डोंबाळा तिने केला ।*
*संतु म्हणे कातर आणिल जो ध्यानी ।*
*आवडेल तो प्राणी सर्व जगा ॥'*

'कातर' हा तेलघाणी, तेल व्यवसायाशी निगडित व्यवसायजन्य शब्द आहे. अभंगातील 'कातर' या प्रतीकाचा अर्थ 'विवेकरूपी साधन' असा घेता येईल. कात्रीने ढेप कातरता येते, घाण्याच्या बैलाला द्यावयाचा चारा कात्रीने कापून टाकला जातो. साधनाचा हा विवेकजन्य सदुपयोग होय. विवेकरूपी शस्त्राने दुष्टांचे पारिपत्य, सज्जनांचे संरक्षण केले जावे. साधनाचा वापर जो विवेकाने करील (मानवी जीवन हे एक साधनच-मोक्षप्राप्तीसाठीचे) तो प्राणी सर्व जगाला वंदनीय ठरेल.

*'मन:शांतीची करुनी शिळ ।*
*तिजवरी बैसले माझे कूळ*
*संतु म्हणे माझ्या घाण्याची ती शिळ ।*
*देते तिळगूळ यमा हाती ॥'*

'शिळ' म्हणजे घाण्याचा मोठा दगड; ज्यामुळे तेलबियांचे चर्वण होऊन तेल निघते. येथे मन:शांतीरूपी शिळ, ज्यामुळे विकारांचे चर्वण होईल, विकार चेंगरले जातील. मन शुद्ध होईल. मन:शांती ही अनेक शरीरमनोव्याधींवरील खात्रीचा उपाय म्हणून तिचे महत्त्व संताजी जगनाडे अधोरेखित करतात. व्यवसायजन्य शब्द– त्यांचा रूपकार्थ म्हणून वापर यामुळेही जगनाडे यांची ही निर्मिती 'संतकाव्य' ठरते.

**घाण्यावरील अभंगातील प्रतिमा–प्रतीके :**

संताजी जगनाडे रचित घाण्यावरील अभंगात पुढील प्रतिमा-प्रतीके व रूपके आढळतात.

१) सुबुद्धिची वढ होऊन । विवेक कातरीस बांधून
मन पवन ओढी जोराने । मग तो घाणा चाले मौजेने ॥

२) नको ते जोखड म्हणे गोरा कुंभार । रोहिदास चांभार तेची म्हणे
नरहरी सोनार चोखामेळा म्हणे । आमुचिही मने बिघडविली ।
संतु तेली म्हणे घाण्याचे जोखड । आहे फार जड जगामाजी ॥

३) एक कुडी वैष्णाची । एक कुडी ती स्नेहाची
एक कुडी घातले शिट । एक कुडी दिसे तेलकट
एके कुडी घातली माळा । एकीचा रंग दिसे सावळा
संतु म्हणे कुडी टोपन । हिचे करू नका जोपन ॥

वढ, कातर, घाणा, जोखड, कुडी, टोपन ह्या प्रतीकांना आध्यात्मिक सूचकार्थता लाभली आहे. वढ (वट लावणे, नियंत्रण करणे या अर्थाने), कातर (साधन विवेक), घाणा (देह/आयुष्य), जोखड (बंधन, जडता), कुडी (शरीर), टोपन (देह–वेष्टन) या अर्थांनी संत जगनाडे यांनी त्यांची योजना केली आहे.

याखेरीज 'देह क्षेत्र घाणा', 'आमुचा तो घाणा त्रिगुण तिळाचा', 'भक्तिभावाची हो लाट टाकियेली', 'नंदी जोडियला मन पवनाचा' ही प्रतीके घाण्यावरील अभंगात आहेत.

संताजी जगनाडे यांची शब्दकळा संत तुकारामांप्रमाणेच सुबोध आहे. त्यांच्याही काव्याला संत तुकारामांप्रमाणेच जनांच्या आत्मोन्नतीची, आत्मोद्धाराची कळकळ आहे. संतश्रेष्ठ तुकोबारायां-प्रमाणेच संताजी जगनाडे यांनीही जातिभेदास स्वीकारार्ह मानले नाही. तसेच मानवी जीवनाचे साफल्य मोक्षप्राप्तीतच असल्याचे सांगितले. षड्रिपूंपासून अलिप्त राहण्याची, विवेक बाळगण्याची; मानवी जीवन सार्थकी लावण्याची शिकवण देऊन संत तुकारामांप्रमाणेच लोकशिक्षकाची भूमिका संताजी जगनाडे यांनी वठवली.

व्यवसायजन्य शब्दांची योजना, सरळ उपदेश,

वाणीची सुबोधता, संस्कृत प्रभावाची शून्यता, समकालीन व बहुजनांतील संतांचा उल्लेख, संत तुकारामांच्या अभंगवाणीचा प्रभाव या कारणांमुळे संताजी जगनाडे यांची निर्मिती ही स्वनिर्मिती ठरते. पर्यायाने त्यांची रचना आख्यानरचना न ठरता संतरचनाच ठरते. संत तुकारामांच्या अमूल्य अशा अभंगांच्या वह्यांचे तळहातावर शिर घेऊन रक्षण करणारे; लोकगंगेतून व स्वस्मरणातून तुकोबांच्या अभंगांचे पुनर्निर्माण व जतन करणारे संताजी जगनाडे यांची उपेक्षा थांबायला हवी.

**संदर्भ :**


१) देशपांडे शशिकांत (१९९१), श्री. संताजी महाराज जगनाडे, मंजुळ प्रकाशन, पुणे, पृ. ५४.
२) उनि., पृ. ६७.
३) उनि., पृ. ६५.
४) ढेरे, रा.चिं. (१९९१) श्री. संताजी महाराज जगनाडे (प्रस्तावना), लेखक– देशपांडे शशिकांत, मंजुळ प्रकाशन, पुणे, पृष्ठांक नाही.
५) घाण्यावरील अभंग – श्री. संताजी महाराज जगनाडे – लेखक देशपांडे शशिकांत, मंजुळ प्रकाशन, पुणे, पृ. ६८ ते ८०.


◇◇◇


**डॉ. फुला बागुल**
३२, गणेश कॉलनी, शिरपूर, जिल्हा – धुळे.
भ्रमणभाष : ९८२२९३४८७४


---

## देणगीदार

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | पावती क्र. | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १) | २.६.२०११ | सृजन फाऊंडेशन | १०,०००/- | ५४७४ | बाल शिबिरासाठी देणगी |
| २) | ३.६.२०११ | सौ. नलिनी मोहन गुजराथी | २,१५,०००/- | ५४७८ | कृष्ण मुकुंद पुरस्कारासाठी देणगी जमा |
| ३) | २१.६.२०११ | मॅनेजर, महाराष्ट्र एक्झीकेट्युव्ह ट्रस्टी प्रा.लि. | २,३००/- | ५५२६ | का.र.मित्र व्याख्यानमालेसाठी देणगी |
| ४) | २६.७.२०११ | श्री. दीपक शिकारपूर | २,२००/- | ५६१० | योगक्षेमार्थ देणगी |
| ५) | २६.७.२०११ | श्री. दीपक शिकारपूर | १,१००/- | ५६१३ | योगक्षेमार्थ देणगी |
| ६) | २७.७.२०११ | श्री. अरुण जाखडे | २,०००/- | ५६१४ | दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनासाठी (ग्रंथालयासाठी) देणगी |
| ७) | ३०.७.२०११ | उत्कर्ष प्रकाशन (सु. वा. जोशी) | १,०००/- | ५६२७ | दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनासाठी (ग्रंथालयासाठी) देणगी |
| ८) | २.८.२०११ | बँक ऑफ महाराष्ट्र | १०,०००/- | ५६८३ | दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनासाठी (ग्रंथालयासाठी) देणगी |
| ९) | ११.८.२०११ | डायमंड पब्लिकेशन्स् | २,०००/- | ५६५१ | दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनासाठी (ग्रंथालयासाठी) देणगी |
| १०) | १८.८.२०११ | अनामिक | २५,०००/- | ५६७७ | दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनासाठी (ग्रंथालयासाठी) देणगी |
| ११) | २४.८.२०११ | संस्कृती प्रकाशन | ४०,०००/- | ५६९० | योगक्षेमार्थ देणगी (तळघराच्या भाड्यापोटी) |
| १२) | २.९.२०११ | हनुमंत धोंडिबा गवळी | १,०००/- | ५७२४ | ग्रंथालयासाठी देणगी |

पुस्तक परीक्षण

# स्वातंत्र्यलढ्यातील सोलापूरचे दीपस्तंभ

– प्रा. डॉ. सौ. लता अकलूजकर

प्रा. डॉ. श्रीकांत येळेगावकर लिखित 'सोलापूरचे स्वातंत्र्यलढ्यातील दीपस्तंभ' हा ग्रंथ म्हणजेच सोलापूरच्या आधुनिक कालखंडातील इतिहासाचा एक चिरंतन ठेवा आहे. ही अशी शिदोरी आहे की, जी वर्षानुवर्षे सोलापूरच्या स्वातंत्र्यचळवळीच्या अभ्यासकांना उपयुक्त ठरणार आहे. सोलापूरची स्वातंत्र्यचळवळ म्हणजे फक्त लष्करी कायदा एवढेच मर्यादित प्रतिबिंब आजपर्यंत जनमानसात उमटलेले होते. परंतु एवढीच या शहराची ओळख राहिली नाही, तर त्या प्रतिबिंबावर असे कितीतरी सोनेरी दंवबिंदू आहेत की, जे अज्ञात राहिले होते. कोणासही त्यांचे अस्तित्वसुद्धा माहीत नव्हते. अशा सोनेरी दंवबिंदूंना समाजासमोर आणण्याचे संशोधकीय काम डॉ. येळेगावकरांनी केलेले आहे.

आकर्षक परंतु तेवढेच अर्थपूर्ण मुखपृष्ठ, नीटपणा, बिनचूक टंकलेखन, दर्जेदार पृष्ठे, अत्यंत दुर्मिळ छायाचित्रे, महत्त्वपूर्ण ग्रंथसूची, मर्यादित पृष्ठसंख्या, योग्य शब्दांत मांडलेला वैयक्तिक कर्तृत्वाचा सारांश ही या ग्रंथाची ठळक वैशिष्ट्ये आहेत. यामध्ये प्रकाशकाचे योगदान फार महत्त्वपूर्ण आहे. अशा रीतीचा, सोलापूरच्या स्वातंत्र्यलढ्याचे वेगळेपण व योगदान पाहताक्षणीच लक्षात येईल, असा हा ग्रंथ वेगळ्या धाटणीचा आहे. प्रत्यक्ष लेखकाचे जे मनोगत आहे, त्यामधून त्यांनी या ग्रंथासाठी किती कष्ट घेतले आहेत, ते दर्शविते. या स्वातंत्र्यलढ्याचे तळमळीचे अभ्यासक व विचारवंत प्रा. डॉ. नीलकंठ पुंडे यांची प्रस्तावना व तिचे आगळेवेगळे नाव 'स्मृतिशलाका' हा तर या ग्रंथास घातलेला शब्दमौक्तिकांचा हारच म्हणावा लागेल.

एकंदरीत ६३ क्रांतिकारकांची जीवनचरित्रे व त्यांचे सोलापूरसाठीचे योगदान या ग्रंथात मांडल्याने या विषयाची व्याप्ती वाढलेली आहे. सोलापूरच्या स्वातंत्र्य चळवळीचे व लष्करी कायद्याचे महत्त्वपूर्ण आधारस्तंभ म्हणून अगदी ५ ते ६ स्वातंत्र्यसेनानी सर्वांना माहीत आहेत. त्यांमध्ये चार हुतात्म्यांचा समावेश आहेच. परंतु या ग्रंथात मात्र या देशभक्तांच्याशिवाय अशा व्यक्तींची माहिती दिली आहे की, जी आजपर्यंत उजेडात आली नव्हती. अंधारातील हे सर्व तेजस्वी दिवे डॉ. येळेगावकर यांनी मोठ्या जिद्दीने व कष्टाने पुन्हा प्रज्वलित केले आहेत. त्यांची चरित्रे मांडून स्वातंत्र्यचळवळीची यशोगाथा अधिकच तेजस्वी बनवली आहे. अनंत केरोजी भोसले, पुरुषोत्तम अढवळकर, परशुरामजी राठी, वसंतराव बडवे, मल्लय्या स्वामी, नानासाहेब आराध्ये, व्यंकप्पा मडूर, नागप्पा नारा, कमलाकर सुमंत अशी कितीतरी देशभक्त मंडळी या स्वातंत्र्यचळवळीच्या ग्रंथ मांदियाळीमध्ये प्रथमच सहभागी झालेली आहेत. केवळ पुरुषवर्गच या लढ्यात सतत भाग घेत होता असे नाही; तर रमाबाई पित्रे, द्वारकाबाई देशपांडे, सुमतीबाई शहा, मीनाक्षीताई साने, शांता बुद्धीसागर इ. भगिनीदेखील या ग्रंथात बोलत्या केल्या आहेत. मुख्य म्हणजे प्रत्येक देशव्रती सेनानीचे नुसते नाव न देता त्याच्या जीवनकार्याचे सार असणारे विशेषण प्रत्येकास दिलेले आहे, हे लेखकाचे केवळ कौशल्य नाही तर ही लेखकाने त्या सर्व स्वातंत्र्यसेनानींची व

त्यांच्या कार्याची घेतलेली खरी दखल आहे. उदा. पहाडी आवाजाचे गायक श्रीनिवास काडगावकर, 'कर्मयोगी'कार रामभाऊ राजवाडे, 'कल्पतरू'कार तात्यासाहेब काकडे, सेवाव्रती रमाबाई नरसिंह पित्रे, माणसं घडवणारे सांगोल्याचे बापूजी, व्रतस्थ पत्रकार पु. ज. बुवा, क्रांतिकारक कमलाकर सुमंत इ. वरून प्रत्येक स्वातंत्र्यसेनानीच्या कर्तृत्वाचे योग्य ते शब्दमूल्यांकन या लेखकाने केले आहे.

आजपर्यंत एवढी एकत्रित माहिती स्वातंत्र्यलढ्याबाबत व त्याच्याशी संबंधित व्यक्तींबाबत कोणीही दिली नव्हती. ती या ग्रंथात उद्धृत करून लेखकाने संशोधनाची अनेक दालने नवीन व तरुण संशोधकांपुढे खुली केली आहेत. पीएच.डी. पदवी घेऊ इच्छिणाऱ्या अनेक अभ्यासकांना उपयुक्त पडणारी ही प्राथमिक स्वरूपाची व अव्वल दर्जाची साधनसामग्री आहे. हा ग्रंथ संग्रही ठेवणे म्हणजे खऱ्या अर्थाने सोलापूरच्या स्वातंत्र्यचळवळीस दिलेली मानवंदना म्हणावी लागेल. म्हणूनच केवळ सोलापूर जिल्ह्यातीलच नव्हे, तर भारताच्या स्वातंत्र्यचळवळीच्या संदर्भात संशोधन करणाऱ्या व तळमळ असणाऱ्या सर्वांनी हा ग्रंथ जवळ बाळगणे गरजेचे आहे.

डॉ. येळेगावकर यांनी हा ग्रंथ लिहून सोलापूरच्या स्वातंत्र्यलढ्याचे ऐतिहासिक व राजकीय मूल्य शिखरावर नेऊन ठेवले आहे. या लेखकाने हा ग्रंथ म्हणजे सुरुवातीचा पायाभूत स्वातंत्र्यलढ्याच्या इमारतीचा चिरा असे समजून संपूर्ण इमारत स्वतंत्र ग्रंथरूपी अनेक दगडी चिऱ्यांनी उभारावी व ग्रंथाची सातत्याने निर्मिती करावी, अशी अपेक्षा आहे.

**'सोलापूरचे स्वातंत्र्यलढ्यातील दीपस्तंभ'**
*लेखक :* प्रा. डॉ. श्रीकांत येळेगावकर
*प्रकाशक :* 'अक्षरलेणं' प्रकाशन, सोलापूर
*पृष्ठे :* २१४
*मूल्ये :* रु. २३०/-

◇◇◇

**डॉ. सौ. लता अकलूजकर**
३४ बी, हांडे प्लॉट, अवंतीनगर,
सोलापूर ४१३००१

## भावपूर्ण श्रद्धांजली!



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे स्थानिक कार्यवाह आणि ग्रंथालय प्रमुख श्री. अनंतराव जोशी यांचे निधन झाले. प्रा. जोशी ह्यांच्या ग्रंथपालन दृष्टीने परिषदेला मोलाचे मार्गदर्शन होत होते. दुर्मिळ ग्रंथांचे प्रदर्शन त्यांनी आयोजित केले होते. ग्रंथालयाला त्यांनी लावलेली शिस्त आणि नूतनीकरण हे उल्लेखनीय कार्य आहे. गेली सात वर्षे त्यांनी म.सा.प. ग्रंथालयाची सेवा केली. त्यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेची भावपूर्ण श्रद्धांजली!

(त्यांचे जुने स्नेही डॉ. श्रीकान्त केळकर यांनी लिहिलेल्या लेखाचा समावेश जागेअभावी करता आला नाही.)



अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# कापूसकाळ

– प्रा. डॉ. सुभाष शेकडे

'कापूसकाळ' ही कैलास दौंड यांची २०७ पृष्ठांची ग्रामीण कादंबरी पश्चिम महाराष्ट्राच्या व मराठवाड्याच्या सीमावर्ती भागातील नारायणवाडी या खेड्यातील शेतकऱ्याची करुण कहाणी आहे. खेड्यात राहणारा जगू नावाचा हा गरीब शेतकरी, सुशा ही त्याची बायको अन् कमल आणि सुभाष ही त्याची दोन मुलं. आई पैठण, पंढरपूर, आळंदीची वारी करणारी. तुटपुंजी कमाई असणारी तीन एकर शेती तो करतो. शेती पिकवताना शेतकऱ्यांना कोणकोणते कष्ट उपसावे लागतात, त्याचे स्वरूप काय असते याची चर्चा केली आहे. जगू हा कादंबरीचा नायक आहे. त्याच्या मनोधारणांचे वेगवेगळे विशेष या कादंबरीतून प्रकट होतात.

गुरं-ढोरं, शेती-जमीन-जुमला, वाडा ही संपत्ती! मात्र जगू हा सामान्य शेतकरी, दारात बैलं नाहीत, गायी-म्हशी असा हा बारदाना नाही. फक्त एक शेळी, बायको – सुशाबरोबर बारा महिने दिवस-रात्र आपल्या शेतीत राबून ते काळ्या आईची सेवा करतात. सवडीच्या वेळी दुसऱ्याच्या शेतावर कामाला जातात. जमेल ते कष्ट करतात. उन्हाळा, पावसाळा, हिवाळ्यात निरनिराळी कामे करतात, घाम गाळतात, उन्हातान्हाची पर्वा न करता शेतीची मशागत करतात.

'कापूसकाळ' ही एका गरीब शेतकऱ्याची शोकांतिका चितारणारी ग्रामीण कादंबरी आहे. शेतकऱ्याचे दारिद्र्य, निरक्षरता, गरिबीशी सामना करताना त्याची होणारी ओढाताण, व्यापारी वर्ग, फेडरेशनवरील अनागोंदी कारभार, अध्यक्षाचा मुजोरपणा, धनदांडग्यांची दडपशाही, नंबराचा घोटाळा, वशिला, सामान्य शेतकऱ्याची फरपट, खस्ता खाऊन पिकवलेल्या पांढऱ्या सोन्याची व्यापाऱ्यांकडून होणारी डोळ्यांदेखत लूट, रानात कष्ट करताना होणाऱ्या यातना, आर्थिक परिस्थितीमुळे पोराबाळांची होणारी आबाळ, रक्ताचं पाणी करून पिकवलेल्या कापसाला मिळणारा मातीमोल भाव, एक नंबरची ग्रेड न मिळणे, कौशल्याबाईचा भोत (कापसाचा) हरवणे, तिला वेड लागणे, आत्महत्येचा विचार म्हातारीच्या मनात येणे, मोहन कातरवड्याचा बैल नंबराच्या रांगेत मरणे, उपासमार करत नंबर लावण्यासाठी महिना-महिना वाट पाहणे, बाया-बापड्यांचे राखण करता-करता ताटकळणे, स्वत:चा झाका-पाका करण्यासाठी कापसाच्या गंजींना आग लावणे म्हणजे सर्व बाजूंनी शेतकऱ्याचे शोषण, त्याच्या नशिबी फक्त खस्ता, कष्ट, अपेक्षा, नकार! या भूमीचा तो मालक असूनही त्याचा कुणीही वाली नाही. त्यातूनच आत्महत्या.

शेतकरी हा केवळ दुष्काळामुळेच आत्महत्या करत नाही, तर त्याचे शोषण करणारी जी राजकीय व्यवस्था आहे, त्या व्यवस्थेला तो कंटाळला आहे. त्या व्यवस्थेचा तो बळी आहे, त्याचे नाते मातीशी आहे, जो दुष्काळ-दारिद्र्याशी सतत संघर्ष करतो तोच आत्महत्येचा बळी ठरतो. वशिल्याने होणारी कापूसकाट्याची पद्धत, त्या पद्धतीविरुद्ध शेतकरी एक होऊन काठ्या हातात घेतात, काटा-मापाड्याला बेदम मारतात. त्यांच्या एकजुटीचा तसेच भावनांचा उद्रेक प्रत्ययास येतो.

या कादंबरीमध्ये माणुसकीचा ओलावाही आहे. शेजाऱ्या-पाजाऱ्यांत स्नेहभाव आहे. आपले दु:ख ते दुसऱ्याचे दु:ख जाणण्याची वृत्ती आहे. रख्माचा बैल (गोऱ्हं) भाड्यापायी ती विकते तर दुसरा बैल रघूच्या सावडीने विहिरीत पडून मोडतो. रघू रख्माला आपला बैल द्यायला तयार होतो; परंतु रख्मा मात्र बदल्यात



अनुक्रमणिका

बैल घेत नाही. इथे तिचा उदात्त भाव पाहावयास मिळतो. आधुनिक शेतीचे धडे मधू देण्याचा प्रयत्न करतो, पण शेतकरी त्याला बधत नाहीत, तरी तो आशावादी आहे. तीच अवस्था कांबळे गुरुजींची होते. अशी नाना तऱ्हेची माणसे पाहावयास मिळतात. सुशाबाई, राघू यांच्यातील चोरटा प्रेमभाव शेळीच्या लघळपणासारखाच आहे. दत्तू, सोम्या या शाळकरी मुलांचा आर्थिक परिस्थितीमुळे बालमजूर म्हणून होणारा वापर विचार करायला लावतो.

'कापूसकाळ'मधील जगू-सुशा शेतकऱ्यांचे प्रतिनिधी ठरावे असे जोडपे. ज्यांचा उदरनिर्वाह फक्त शेतीवरच चाललेला आहे त्यांच्या वाट्याला काय येते? त्यांचे स्थान काय ठरते? त्यांचा सोशिकपणा, प्राथमिक गरजांची अपेक्षा, दारिद्र्याशी अविरत चाललेला झगडा, भावनांची घुसमट, आहे त्यात समाधान मानण्याची वृत्ती इ. जे काही विशेष जाणवतात, ते बहुतांशी शेतीवर जगणाऱ्यांचे, सर्वसाधारण म्हणता येतील, असे स्वभावविशेष आहेत.

काळाच्या संदर्भात कृषिजीवन कसे जास्तीतजास्त परावलंबी होत गेले, त्याला अवकळा कशी येत गेली, परिणामी महाराष्ट्रातील बहुसंख्य समाज एका आर्थिक अरिष्टाच्या ग्रहणात कसा सापडत चालला आहे, याचे विदारक शोकात्म सत्य व्यक्त करण्याची क्षमता प्रस्तुत कादंबरीच्या कथनात आहे. 'कापूसकाळ' वाचताना टप्पाटप्प्याने ही वस्तुस्थिती कशी जाणवत जाते, हे मुळातून पाहण्यासारखे आहे.

'कापूसकाळ' या कादंबरीत ग्रामजीवनातील सारीच सुख-दुःखे ग्रामीण बोलीभाषेतून अपरिहार्यपणे व्यक्त होतात. लेखकाने ग्रामीण म्हणींचा चपखलपणे वापर केला आहे. उद्वेग, राग, चीड व्यक्त करताना हासडलेल्या शिव्या आणि लोकगीतातील स्त्रियांच्या ओव्या तर तत्त्वज्ञान सांगून जातात. गावरान, रांगडी व अर्थगर्भ बोलीभाषा त्या अनुभवाचाच प्रत्यय आणून देते. मातीशी इमान राखणारी, ग्रामीण संवेदनशीलता जपणारी, सम्यक् ग्रामजीवन दर्शवणारी वास्तवाभिमुख, आत्मनिष्ठ, शेतकऱ्यांच्या पाचवीलाच पुजलेल्या दारिद्र्याची वीण उकलणारी भाषा आहे. निसर्गाचं ऋतुचक्र मात्र अखंड फिरत राहणार आहे. शेतीचं रहाटगाडगं न थांबता सुरू आहे. सुरूच राहणार आहे. जगूसारखे शेतकरीही पिढ्यान्‌पिढ्या यात फिरत राहतील.

**'कापूसकाळ'** (कादंबरी)
*लेखक :* कैलास दौंड,
मीरा बुक्स अॅण्ड पब्लिकेशन्स, औरंगाबाद २०१०
*मूल्ये :* रु. १००/-, *पृष्ठे :* २०७

◇◇◇

**प्रा. डॉ. सुभाष रोकडे**
मराठी विभाग प्रमुख
बाबूजी आव्हाड महाविद्यालय
पाथर्डी जि. अहमदनगर
पीन - ४१४१०२

'निवडक जुने' ग्रंथपरिचय

# कवी, इतिहास संशोधक, नाटककार कै. वासुदेवशास्त्री वामनशास्त्री खरे चरित्र

– सौ. सुमन आ. प्रभुमिराशी

पश्चिम किनारपट्टीवर गुहागर हे निसर्गसंपन्न गाव. अशा गावात विद्वान, वेदसंपन्न वामनशास्त्री खरे आई गंगाबाई हिच्या पोटी ५ ऑगस्ट १८५८ साली जन्माला आले. लहानपणापासून शीघ्र कवी व कुशाग्र बुद्धिमत्ता, तीर्व स्मरणशक्ती लाभली होती. धाडसी, हूड असा वासुदेव, त्याला निसर्गातील सौंदर्य पाहायला आवडे. मैलोन्मैल समुद्रात पोहणे, पुळणीवर लोळणे त्याला आवडे. घरची अत्यंत गरिबी होती. पुराण सांगणे, वेदविद्या व शास्त्रार्थ चाले. गावात वामनशास्त्री व आजोबा महादेवशास्त्री यांना खूप मान होता. शाळेत असताना मोरोपंत, मुक्तेश्वर, वामनपंडित यांच्या आर्या पाठ होत्या. बुद्धिमत्ता व स्मरणशक्तीमुळे एकदा किंवा दोनदा ऐकले की पाठ होऊन जाई.

मोठ्या लोकांच्याकडून शिक्षणासाठी अनेक संधी आलेल्या नाकारल्या. मनामध्ये स्वावलंबनाने शिकायचे असा पक्का निश्चय होता. वयाच्या पंधराव्या वर्षी त्याचे लग्न झाले व सोळावे वर्षं लागता ठरवून सातारा येथे आचार्य गजेंद्रगडकर यांच्या विद्या-अभ्यासाची सोय झाली; परंतु जेवणाची सोय नसल्याने त्याचे खूप हाल झाले. माधुकरी मागून व सातारा येथील महाराष्ट्र मित्र व इतर पेपरमध्ये संपादकीय लिखाण लिहू लागले. त्या बदल्यात १ वाटी अंबिल, १ भाकरी मोबदला मिळे. मुद्रिते तपासण्याचे दोन रुपये मिळत. घरच्यांकडून पैशांची मदत मिळणे शक्य नव्हते. सातारच्या अडीच वर्षांत कौमुदी, तर्कशास्त्रातील कला यातील त्याची प्रगती व बुद्धिमत्ता पाहून आचार्य खूष झाले. मल्लखांब, बुद्धिबळ उत्तम खेळत. पोहण्यात तरबेज होते. शास्त्री ही पदवी मिळवली.

पुण्यात नेने मास्तरांनी त्यांना बोलावून घेतले, एका शाळेत बदली शिक्षकाच्या नोकरीसाठी! पैशाची चणचण-गरज होती. तेव्हा ते पुणे येथील रु. १५/- पगारावर शिक्षकाच्या नोकरीवर रुजू झाले. ते संस्कृत उत्तम शिकवीत. विद्यार्थिप्रिय झाले. या पुण्याच्या मुक्कामात कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री चिपळूणकर, लो. टिळक, सुधारक आगरकर, स्वदेशी कीर्तनकार वासुकाका जोशी यांचा परिचय होऊन त्याचे मैत्रीत रूपांतर झाले. तसे ते समवयस्क होते. विशेषत: लो. टिळक यांची मैत्री, स्नेह जास्त होता. टिळकांनी चालू केलेल्या वृत्तपत्राला 'केसरी' हे नाव खरेशास्त्री यांनीच सुचविले. त्यावरील ध्येयदर्शक भाषांतरीत श्लोकही त्यांनीच लिहिलेला आहे. त्यांची मोठमोठ्या विद्वान मंडळींत उठबस होती. पुण्यात शिक्षकी नोकरीशिवाय स्वत: प्रयत्नाने व चिकाटीने व्याकरणावरील काशिका खंडाचा अवघड अभ्यास पूर्ण केला. लो. टिळक, आगरकर, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना १८८० साली केली. त्यामध्ये खरेशास्त्री यांचे योगदान मोठे आहे. त्या शाळेत त्यांनी संस्कृत शिक्षकाची नोकरी एक वर्ष केली. त्याच वेळेस मिरजेचे स्टेट कारभारी केळकरांनी लो. टिळकांना मिरज येथे सरकारी शाळेत संस्कृत शिकवणाऱ्या शास्त्रींची गरज होती. तेव्हा अशा व्यक्तीला पाठवून द्यावे. अशी मागणी केली, तेव्हा लो. टिळकांनी खरेशास्त्री यांना मिरजेस जाण्यास सांगितले. तेव्हा ते मिरज येथील शाळेत



अनुक्रमणिका

नोकरीवर हजर झाले.

मिरजेतील हवामान, स्वस्त राहाणीमान, पगार रु. ३५/- त्यामुळे त्यांनी नोकरी स्वीकारली. संस्कृत उत्तम शिकवीत. इंग्रजी शाळा असल्याने आपल्यालाही इंग्रजी यायला पाहिजे, या विचारानी इंग्रजी अक्षरओळख करून एक वर्षात ते उत्तम बोलू लागले व वाचू लागले. बुद्धिमत्तेच्या जोरावर व चिकाटीमुळे हे शक्य झाले. रसेलसाहेब पुन्हा शाळा तपासणीसाठी आले, त्यांना आश्चर्य, कौतुक वाटले. त्यांनी त्यांना न्यायशास्त्र्याची नेमणूक व पगार सालाना रु. १२००/- देऊ केला; परंतु त्यांनी ती नोकरी नाकारली. बी.ए., एम.ए.चे विद्यार्थी इंग्रजी विषयाकरिता शंकानिरसन करण्यासाठी येत.

त्यांनी इंग्रजीची ४५० पुस्तके वाचून काढली. त्यांचे वाचन, लेखन रोज रात्री चाले व ते समईच्या प्रकाशात चाले. एकदा एक पुस्तक घेतले की सकाळ झाली तरी वाचन चालूच असे. ते म्हणत, वाचायला लागले की झोपेचे स्मरणच होत नाही.

काव्यलेखनही चालूच होते. जन्मभूमी, चंद्रोदय, मृत्यू गोपिकाबाईंचा, शोक इ. बरेच काव्य त्यांचे अप्रकाशित आहे. काही काव्ये शालेय पाठ्यपुस्तकात प्रसिद्ध झालेली आहेत. आत्तापर्यंत समुद्रावर कुणीही महाकाव्य केलेले नाही. कै. वासुदेवशास्त्री यांनी 'समुद्र' महाकाव्य लिहिले. ७-८ प्रकरणे आहेत. १) समुद्र तुफान, २) खलाशांचे समुद्रात जाणे, ३) त्यांचा विरह, ४) मासे जलचर व शोध अशी प्रकरणे आहेत. १८८४ साली हे काव्य लिहिले. नंतर यशवंतराय होळकर या पराक्रमी सरदाराचे शौर्य, मातृभक्ती, स्वामीभक्ती असे अनेक विषय घेऊन त्यांनी यशवंतराय महाकाव्य लिहिले. त्याला दक्षिणा प्राइज कमिटीचे मोठे बक्षीस मिळाले. त्यामुळे शास्त्रीबुवांना लौकिकअर्थाने प्रसिद्धी मिळाली. इकडे शाळा – फुरसतीच्या वेळेत काव्यलेखन चाले. मुंबई विद्यापीठ बी. ए.च्या वर्गाकरिता यशवंतराय महाकाव्य अभ्यासक्रमात समाविष्ट केले होते. अनेक संस्थानिक उदा. मिरजकर संस्थान– पटवर्धन, इचलकरंजी संस्थान– सांगलीकर, जमखंडी, करवीर संस्थान राजे लोक शास्त्रीबुवांवर प्रेम करीत. त्यांच्याकडून त्यांनी प्रसंगोपात संस्कृत काव्य लिहून घेतले. हे सर्व चालू असताना सामाजिक कार्य चालूच होते. त्यांनी खालीलप्रमाणे संस्थांना मदत केली.

१) लो. टिळकांच्यावर वेळोवेळी खटले भरले. त्यावेळी वर्गणी जमा करून व पदरची रक्कम मदत केली. महाराष्ट्र 'होमरूल' चळवळीस मदत केली.

२) स्त्रियांच्या चळवळीकरिता चालविलेल्या कार्याला त्यांनी वर्गणी जमा करून ती मिरज येथे धोंडो केशव कर्वे आले असता त्यांना दिली.

३) इतिहास संशोधक मंडळ, पुणे या संस्थेस पदरचे रु. १२००/- वर्गणी दिली.

घरची जबाबदारी असल्याने आई असेपर्यंत पैसे घरी पाठवीत. भाऊ परशुरामशास्त्री यांनी त्यांच्या दुखण्याकरिता खूप पैसा खर्च केला. नोकरी सरकारी असल्याने महाभयंकर प्लेगच्या साथीमध्ये अनाथ मुलांची व्यवस्था लावण्याचे काम त्यांनी उत्तम रीतीने पार पाडले. सरकारकडून त्याचे कौतुक झाले.

कोल्हापुरात शाहूमहाराज दत्तकविधान कार्यक्रमा-करिता बक्षीस लावून नाटके मागविली तेव्हा शास्त्रीबुवांच्या गुणोत्कर्ष नाटकाला बक्षीस मिळाले. तो प्रयोग राजाराम कॉलेजमधील विद्यार्थ्यांनी सादर केला. शिवाजी व संभाजी – त्यांची स्वामीनिष्ठा हा विषय घेऊन नाटक लिहिले. त्याच्या तीन आवृत्त्या निघाल्या.

एकदा नाना फडणवीसांच्या जन्मगावी मेणवली येथील पत्रव्यवहार पाहून, त्यावरून नाना फडणवीस चरित्र लिहिले व त्याचेच सुधारून 'अधिकारयोग' हे पुस्तक लिहिले. नानांचा भित्रेपणा, तलवारी कधी चालविल्या नाहीत इ. चुकीच्या समजुती पसरविल्या होत्या त्या सप्रमाण खोडून काढल्या.



अनुक्रमणिका

त्यांच्या जन्मगावी दादासाहेब खोपर्डे यांच्या अध्यक्षतेखाली साडेतीन तास वाचन झाले. त्यांनी लिखाणाकरिता डेस्क वा टेबल वापरले नाही. ते लिहायला तक्क्या वापरीत असत.

एकदा मिरज संस्थानचे कारभारी सोवनी त्यांना म्हणाले, "एकदा मिरज मळे संस्थानमधील पत्रव्यवहार पाहा. अनेक गोष्टींचा खुलासा होईल." त्यामध्ये हिंदुस्थानातून होणारा पत्रव्यवहार होता.

३०० रुमाल गट्ठे – त्यातील जवळजवळ सहा लाख पत्रे होती, ते सर्व पाहून त्यांना अतिशय आनंद झाला. 'यासाठीच जन्म आपुला' इतके मन त्यात रमले.

वयाच्या तिसाव्या वर्षापासून मरेपर्यंत काम चालू होते. सतत ३५ वर्षे अहोरात्र खपून खरेशास्त्री यांनी कागदरूपी सागरमंथन करून त्यातून अनेक रत्ने बाहेर काढली. हे करीत असताना बुद्धिबळ, खेळ, मल्लखांब सोडले. काव्य करण्याचे सोडून दिले. एकच ध्यास -इतिहास संशोधन! याकरिता मिरज-बुधगाव ७ मैल + ७ मैल पायी हेलपाटे घातले. त्यांनी ऊन, पाऊस, वारा, भूक विसरून शरीराची होळी केली, हाडाची काडे केली. रात्रीचा दिवस केला. अनेक संस्थाने तैनातदार, इनामदार, जहागिरदार यांच्याकडचा पत्रव्यवहार पाहिला. शास्त्रीबुवांच्या 'प्रचंड उद्योगाचा महामेरू' या दप्तराचे संशोधन, संग्रहण, प्रकाशन होय. ५०० पत्रे = १ पत्र असे प्रमाण होते. दप्तर चाळणे, निवड करणे, तारीखवार लावणे, काही पत्रांवर तिथी, तारीख नाही. काही पत्रांवर उर्दू, पारशी भाषा, काही पत्रे पोर्तुगीज भाषेतील, त्या भाषेचा अर्थ समजून घेणे हे करण्यास किती त्रास झाला असेल. त्यांनी भूगोलाचा अभ्यास केला. इंग्रजी भाषेचे अपभ्रंश इतिहास लिहिणे कठीण होते. त्याचे सत्य पडताळून पुस्तकात टीपा देणे. ५०० पत्रे = १ पत्र असे प्रमाण होते. हे सर्व त्यांनी का केले? त्यांना त्याचा स्वत:ला काहीच फायदा नव्हता.

पूर्वजांनी केलेल्या पराक्रमांनी इतिहास रचला, शौर्य गाजविले. त्यांचा इतिहास जिवंत करून लोकांसमोर यावा, याकरिता स्वदेशीशक्ती जागृत व्हावी, संस्कारक्षम योद्धे निर्माण व्हावेत याकरिता पदरमोड केली. म्हणावी तशी कुणी मदत केली नाही. खरं तर, संस्थानिकांनाही शक्य असताना मदत केली नाही. लोकांना वेळोवेळी आव्हान करण्यात आले. पहिला भाग प्रसिद्ध झाला, दुसरा झाला परंतु वाचकवर्ग कमीच मिळाला. पहिल्या भागाच्या प्रती विकून पैसा उभा करावा, पुढील भाग छापावा असे चालू होते. प्रकाशनाचा ऐपतीबाहेर खर्च केला. काही माणसे मदतीला घेऊन त्यावेळचे रु. १५०० खर्च केले. लो. टिळकांनी केसरीतून लोकांना आवाहन केले– 'पूर्वजांच्या पराक्रमाची स्मृती कायम ठेवायची असेल व राष्ट्र उदयास यावे असे वाटत असेल, तर कार्यास सढळ हाताने मदत करा.' मराठी वाङ्मयात इतिहास, काव्य, नाटक या तीनही शाखांत त्यांनी आपले नाव चिरंतन करून ठेवले आहे. शास्त्रीबुवा समाधानी होते. प्रसिद्धीच्या मागे न लागता आपले काम नेटाने करणे हा त्यांचा स्वभाव! साडेपाच फूट उंच, गोल चेहरा, भरपूर मिशा, डोक्याला रुमाल, शॉर्ट कोट, पातळ सदरा व हातात बळकट काठी. पाहाणाऱ्यावर त्यांची छाप पडे.

आर्थिक विवंचना सतावत होती. शाळा-शिकवण्या चालू होत्या. गरिबी त्यांनी भोगली होती. त्यातच संतोषाने राहात. घरच्या मंडळींनी अतिशय काटकसरीने संसार चालविला.

त्यांचे वाचन, लिखाण रात्री समईच्या मिणमिणत्या प्रकाशात चाले. एकदा तर मंडळी माहेरी गेल्या होत्या. वाती संपल्या होत्या तेव्हा बसायची सुताची सतरंजी दोन हात संपविली. असे त्यांचे काम देहभान हरपून चाले.

इतिहास संशोधन चालू असताना त्यांनी खालील साहित्य लेखन केले. (१) ऐतिहासिक लेख संग्रह – १ ते १२ खंड ३५० पाने.

२) अधिकार - नाना फडणवीस चरित्र
३) हरिवंशाची बखर
४) इचलकरंजी संस्थानचा इतिहास
५) ग्रॅन्ड डफच्या चुकांचे हप्ते
६) मालोजी-शहाजी
७) घोरपडे घराण्याचा इतिहास
८) फुटकळ चुटके– हा काव्य संग्रह दर महिना प्रसिद्ध करत.

एकदा महाराष्ट्र नाटक मंडळीच्या कारखानीसांनी नाटक लिहून मागितले. दोघांची बरीच चर्चा झाली. नाटकामधून बऱ्यापैकी पैसा मिळेल व संशोधन आणि छपाईचे काम सुलभ होईल. म्हणून त्यांनी नाटके लिहून दिली.

१) तारामंडळ, २) संगीत चित्रवंचना, ३) संगीत उग्रमंगल, ४) संगीत कृष्णकांचन, ५) संगीत देशाकंटक, ६) शिवसंभव.

यांपैकी शिवसंभव, संगीत उग्रमंगल व तारामंडळ ही नाटके उत्तम चालली. खेळ हाऊसफुल्ल!

शिवसंभव– छत्रपती शिवाजी महाराज जन्मावर आधारित 'उग्रमंगल' नाटकाला तर नृत्यप्रधान नायिका असलेल्या नाटकाचा मान व त्यात लता मंगेशकरांचे वडील दीनानाथ मंगेशकर कथ्थक शिकून नृत्य व गायन करीत. स्टेजवर प्रवेश करीत. या नाटकांमुळे आर्थिक स्थिती सुधारली. अखंड ३५ वर्षे कामाच्या दगदगीमुळे त्यांना आमांश व मूळव्याधीचा त्रास होऊ लागला. त्यांची पचनशक्ती, तब्येत उत्तम व खाण्याची आवड-नावड नव्हती. शरीराने आत्तापर्यंत साथ दिली; परंतु मृत्यूपूर्वी शेवटची २ वर्षे आजाराने हैराण झाले. तरी काम चालूच होते. मे महिनाअखेर १९२४ साली १५ दिवस आजारी पडले. त्यांचा आजार वाढला. जीवाची तगमग होई. कधी शुद्धीत तर कधी भ्रमात इतिहासच बडबडत. कधी शुद्धीवर असताना लेखन चाले. डॉक्टरांनी खूप उपाय केले. १३, १४, १५ व्या भागाचे लेखन चालू होते. एकदा अखंड १० तास लेखन केले, 'वही वामनाकडे दे म्हणाले' व मान टाकली ती कायमची! ११ जून १९२४ साली स्वर्गवास झाला. त्यांनीच लिहिलेल्या मृत्यू या काव्यातील काही ओळी.

*नाना संकट कंटकांकित अशा संसाररूपी प्रथा ।*
*आलो येथेवरी पुढे न कळते होणार कैसी स्थिती? ॥*
*थांबावे मम मार्ग संक्रमण हे वाटेल केव्हा तुला?*
*सानिध्या तव सर्व मंगलमया! आत्मा असे लोभला ॥*
*इष्टांनी वेढीलेल्या निजगृही अथवा दूर देशी भुकेला*
*घोरारण्यास किंवा जलनिधी सलीला लंघिता श्रांत झाला ॥*
*माझा देह कोण्या स्थितीतही असता मृत्यू येवो खुशाल ।*
*इच्छा ही देवाधिदेवा! तव धरीन शिरी शांतीने सर्व काळ ।*

'खरेशास्त्री यांच्याएवढा अवाढव्य माहितीचा माणूस एखाद्या राष्ट्रात वारंवार उपजत नसतो. मागील २०० वर्षांत व पुढील २०० वर्षांत असा माणूस होणे नाही,' असे खरेशास्त्रींबद्दल राजवाडे यांनी म्हटले आहे.

◇◇◇

**सौ. सुमन आ. प्रभुमिराशी**
'गजराज' अपार्टमेंट, युनिट क्र. ४
गणंजय हौ. सोसा., आझादनगर
कोथरूड, पुणे-३८. मो. : ९६२३०२७४०३

## वरील ग्रंथाविषयी

*ग्रंथाचे नाव :* प्रसिद्ध इतिहास संशोधक गुरुवर्य वासुदेवशास्त्री वामनशास्त्री खरे-चरित्र व ग्रंथ परिचय (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
*लेखक :* दामोदर मोरेश्वर भट
*प्रकाशन वर्ष :* १९२९
*प्रकाशक :* स्वत: लेखक
*मुद्रक :* वामन वासुदेव अतीतकर बी.ए.
नवीन समर्थ विद्यालयाचा समर्थ छापखाना,
९४७ सदाशिव, पुणे २.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त
(१ जून २०११ ते ३१ ऑगस्ट २०११)

## – पुणे शहर –

**१) दि. २७.६.२०११ : ज्येष्ठ लेखिका कमल देसाई श्रद्धांजली सभा :** अध्यक्ष डॉ. अरुणा ढेरे. वक्ते : हृषीकेश आर्वीकर, प्रा. रतनलाल सोनग्रा, प्रा. निलिमा गुंडी, अरुण जाखडे, नंदा पैठणकर, उमा कुलकर्णी, डॉ. अरुणा ढेरे यांनी अध्यक्षीय समारोप केला. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी हे व्यासपीठावर होते.

**२) दि. १० जुलै २०११ :** जी. ए. कुलकर्णी जयंती म.सा.प. व जी.ए. कुटुंबीय यांच्या संयुक्त विद्यमाने जी. ए. कुलकर्णी यांच्या ८९व्या जयंतीनिमित्त पूर्वार्धात डॉ. वीणा देव यांचे 'जी. एं.च्या संपूर्ण कथाविश्वातील स्त्रिया' या विषयावर भाषण झाले व कार्यक्रमाच्या उत्तरार्धात जी. एं. च्या 'रक्तचंदन' या कथासंग्रहातील 'वस्त्र' या कथेचे नाट्याभिवाचन सादर करण्यात आले. उत्तरा बावकर, अनुराधा जोशी व गजानन परांजपे यांनी हे नाट्याभिवाचन सादर केले. व्यासपीठावर डॉ. वैद्य, प्रा. मिलिंद जोशी व सुनील महाजन हे होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. उद्धव कानडे यांनी सूत्रसंचालन व आभार मानले. जी.ए. कुलकर्णींच्या कुटुंबीयांपैकी नंदा पैठणकर यावेळी उपस्थित होत्या.

**३) दि. १३ जुलै २०११ : कै. सोनोपंत दांडेकर पुरस्कार प्रदान समारंभ :** हा पुरस्कार 'वारकरी विश्व आणि समर्थ रामदास' या डॉ. मुकुंद दातार यांच्या पुस्तकाला देण्यात आला. संत साहित्याचे अभ्यासक डॉ. सदानंद मोरे यांच्या हस्ते हा पुरस्कार देण्यात आला. डॉ. म. वि. गोखले यांनी मनोगत व्यक्त केले. यानंतर कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. मुकुंद दातार यांनी पुरस्कार स्वीकारल्यानंतर आपले विचार प्रकट केले. यानंतर प्रमुख कार्यवाह व समारंभाचे प्रमुख वक्ते प्रा. मिलिंद जोशी यांनी आपले विचार प्रकट केले. अध्यक्षीय समारोप डॉ. सदानंद मोरे यांनी केले. शेवटी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी आभार मानले.

**४) दि. १९ जुलै २०११ : लोकशाहीर आण्णा भाऊ साठे स्मृतिदिन :** म. सा. परिषद व दलितसाहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने लोकशाहीर आण्णा भाऊ साठे स्मृतिदिनानिमित्त शाहीर दादा पासलकर यांचे 'महाराष्ट्राची शाहिरी परंपरा' या विषयावर व्याख्यान झाले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत केले. दलित साहित्य परिषदेचे अध्यक्ष बाळ आल्हाट यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला. शाहीर दादा पासलकरांच्या व्याख्यानानंतर त्यांचे शिष्य सतीश औटी यांनी 'मुंबईची लावणी' ही शाहीर आण्णा भाऊ साठे यांची प्रसिद्ध लावणी श्रोत्यांसमोर सादर केली. दलित साहित्य परिषदेचे सचिव व दुर्योधन अहिरे यांनी आभार मानले व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**५) दि. २० जुलै २०११ : प्रा. बाबूराव शिरोळे पुरस्कार वितरण समारंभ :** परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर अध्यक्षस्थानी होते. कै. प्रा. बाबूराव शिरोळे यांच्या स्मरणार्थ बालकुमार साहित्यातील ज्येष्ठ लेखकास आणि कै. शांतादेवी बाबूराव शिरोळे यांच्या स्मरणार्थ लेखिकेस

असे हे दोन्ही पुरस्कार डॉ. शेजवलकर यांच्या हस्ते अनुक्रमे माधुरी पुरंदरे व डॉ. अश्विनी धोंगडे यांना प्रदान करण्यात आले. स्वागत व सूत्रसंचालन कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी आपले विचार प्रकट केले. डॉ. धैर्यशील शिरोळे व श्रीमती वसुंधरा शिरोळे यांचा गुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

माधुरी पुरंदरे व डॉ. अश्विनी धोंगडे यांचा परिचय प्रकाश पायगुडे यांनी करून दिला. पुरस्कार विजेत्या माधुरी पुरंदरे व डॉ. अश्विनी धोंगडे यांनी आपापली मनोगते व्यक्त केली. अध्यक्षीय समारोप डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी केला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**६) दि. २१ जुलै २०११ : कै. वामन मल्हार जोशी स्मृतिदिन :** 'माझे साहित्यविश्व' या विषयावर प्रसिद्ध लेखक राजेंद्र खेर यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

**७) दि. २६ जुलै २०११ : कै. गो.रा. परांजपे स्मृतिपुरस्कार वितरण समारंभ :** प्रारंभी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह यांनी डॉ. विजय भटकर, डॉ.प्र.चिं. शेजवलकर यांचे पुष्पगुच्छ व भेटवस्तू देऊन स्वागत केले. यानंतर दीपक शिकारपूर यांचा परिचय प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी करून दिला. डॉ. दीपक शिकारपूर यांनी पुरस्कार स्वीकारल्यानंतर आपले मनोगत व्यक्त केले. याचवेळी त्यांच्या विनंतीवरून प्रा. तपस्वी सरांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. प्रा. तपस्वी सरांनी सुद्धा आपले मनोगत व्यक्त केले. डॉ. विजय भटकर यांनी आपले विचार प्रकट केले. शेवटी डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले. सभेच्या प्रारंभी डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी व सदानंद भटकळ यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**८) दि. २९ जुलै २०११ : संत सावतामाळी स्मृतिदिन :** 'वारी आणि वारकरी : संत संप्रदायाचे योगदान' या विषयावर संत साहित्याचे अभ्यासक डॉ. अरविंद नेरकर यांचे व्याख्यान झाले. स्वागत, परिचय, प्रास्ताविक व आभार प्रदर्शन कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी पुष्पगुच्छ देऊन वक्त्यांचा सत्कार केला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**९) दि. ३ ऑगस्ट २०११ :** दि. ३ ऑगस्ट ते दि. ६ ऑगस्ट २०११ असे चार दिवस पुण्यातल्या टिळक स्मारक मंदिरात परिषदेच्या वा.गो. आपटे संदर्भ ग्रंथालयातील दुर्मिळ ग्रंथांचे प्रदर्शन आयोजित करण्यात आले. दि. ३ ऑगस्ट २०११ रोजी या प्रदर्शनाचे उदघाटन शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांच्या हस्ते झाले. याप्रसंगी प्रमुख उपस्थिती डॉ. दीपक टिळक यांची होती. तसेच विष्णुपंत मेहेंदळे व म. श्री. दीक्षित यांचा विशेष सत्कार करण्यात आला. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी, कोषाध्यक्ष सुनील महाजन, ग्रंथालय विभाग कार्यवाह अनंत जोशी उपस्थित होते. पुस्तकप्रेमींनी चार दिवसांत या ग्रंथ प्रदर्शनाला आवर्जून भेट दिली.

**१०) दि. ८ ऑगस्ट २०११ : नाट्यविभाग : नाट्यकार्यशाळेचा उद्घाटन सोहळा :** प्रा.द.मा. मिरासदार यांच्या हस्ते पुढील ३ महिने चालणाऱ्या कार्यशाळेचे उद्घाटन झाले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. प्रा. मिरासदारांच्या हस्ते नटराजाचे पूजन करून हे उद्घाटन झाले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी व योगेश सोमण व्यासपीठावर उपस्थित होते. प्रा. मिरासदार यांनी

मनोगत व्यक्त केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. यानंतर योगेश सोमण यांनी उपस्थित व शिबिरार्थींशी प्रारंभाचा संवाद साधला.

**११) दि. २० ऑगस्ट २०११ : डॉ.गं.ना. जोगळेकर स्मृती पुरस्कार :** यंदाचा पुरस्कार मराठीचे ज्येष्ठ अभ्यासक प्रा.डॉ.द.पं. जोशी (अध्यक्ष, मराठी साहित्य परिषद, हैदराबाद) यांना जाहीर झाला. त्यांच्या वतीने हा पुरस्कार प्रकाशक आनंद लाटकर यांनी स्वीकारला. परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत प्रास्ताविक केले. अध्यक्षस्थानी डॉ. गो.बं. देगलूरकर होते. त्यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आला. जोगळेकर यांचे पुत्र पराग जोगळेकर व कुटुंबीय उपस्थित होते. प्रा. सुजाता शेणई यांनी जोगळेकरांच्या आठवणी सांगितल्या. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले.

**१२) दि. २१ ऑगस्ट २०११ : डॉ.गं.ना जोगळेकर स्मृतिदिन :** 'मराठीचे अध्यापन - नवी आव्हाने' या विषयावर परिसंवाद आयोजित केला होता. डॉ. मनोहर जाधव, डॉ. श्यामा घोणसे, सुमेधा चिथडे या वक्त्यांनी परिसंवादात भाग घेतला. डॉ.न.म.जोशी अध्यक्षस्थानी होते. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी सूत्रसंचालन केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी समारोप केला.

**१३) २६ ऑगस्ट २०११ : परीक्षा विभाग : मराठी अध्यापक जिल्हास्तरीय कृतिसत्र :** त्या दिवशी सकाळी ११ ते ४ पुणे जिल्हा मराठी अध्यापक संघ व म.सा.प. परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने दिवसभराचे चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चासत्रात माध्यमिक शालेय स्तरावरील सुमारे १०० अध्यापक सहभागी झाल्याने प्रतिसाद चांगला लाभला. चर्चासत्राचे उद्घाटन परिषदेचे अध्यक्ष व साहित्यिक प्रा.द.मा. मिरासदार यांच्या हस्ते झाले. प्रमुख उपस्थिती शिक्षणाधिकारी विद्या शिंदे कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, डॉ.अ.ल.देशमुख प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी, सुनीता राजे पवार व ए.बी. तकटे यांची होती. तीन सत्रांत मराठीचे लेखन, मराठी व्याकरण व कवितेचे अध्यापन या विषयांवर अनुक्रमे डॉ. कल्याणी दिवेकर प्राचार्य वैजयंती चिपळूणकर व डॉ. नीलिमा गुंडी यांची व्याख्याने झाली.

**१४) दि.२९ ऑगस्ट २०११ : श्रद्धांजली सभा :** म.सा.प.चे ग्रंथालय विभाग कार्यवाह कै. अनंत जोशी यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी पुणे विद्यापीठ ग्रंथालय संघ व ग्रंथालय संचालनालय महाराष्ट्र शासन यांच्या संयुक्त विद्यमाने सभा आयोजित करण्यात आली. अध्यक्षस्थानी मसापच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य होत्या. प्रास्ताविक श्री. मुकुंद ऊजळंबकर यांनी केले. अनंत जोशी यांचे कुटुंबीय सभेला उपस्थित होते. प्रारंभी दोन मिनिटे सर्वांनी उभे राहून श्रद्धांजली अर्पण केली. शां.ग.महाजन यांचा संदेश ऊजळंबकर यांनी वाचून दाखविला. कार्यवाह दीपक करंदीकर, मुकुंद अनगळ, डॉ. अरविंद संगमनेरकर, डॉ. मेधा सिधये, प्र.द.काळुस्कर, प्रा. राम शिंदे, अरुण जाखडे, श्रीधर सहस्रबुद्धे, प्रा.के.रं. शिरवाडकर, मुकुंद ऊजळंबकर, प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी, सु.वा.जोशी या वक्त्यांनी आपल्या भावना व्यक्त केल्या. उद्धव कानडे यांनी परिषदेच्या ग्रंथालय कर्मचाऱ्यांच्या वतीने, त्यांच्या लिखित भावना वाचून दाखविल्या. शोकप्रस्तावाचे वाचन महेंद्र मुंजाळ यांनी केले.

**नोंद : दीपक करंदीकर**
स्थानिक कार्यवाह मसाप, पुणे.

कार्यवृत्त पाठविताना अनेक पत्रांद्वारे न पाठविता संबंधित अंकाच्या प्रकाशन-महिन्याच्या तिसऱ्या महिन्याच्या १५ तारखेपर्यंत एकत्रित स्वरूपात पाठवावे.
– संपादक



अनुक्रमणिका

## — वारजे कोथरुड शाखा —

**रविवार दि. २.५.२०११ रोजी** 'स्वा. सावरकर आणि अंदमान' या विषयावर सटीप (Slide Show) व्याख्यान श्री. दिलीप बर्वे यांचे हॅपी कॉलनी सभागृह, कोथरुड येथे सायंकाळी सभासदांसाठी ठेवण्यात आले होते. सर्व सदस्यांनी या व्याख्यानाचा लाभ घेतला. **रविवार दि. १२.६.२०११ रोजी** श्री सरस्वती विद्यामंदिर, डहाणूकर कॉलनी, कोथरुड येथे सभासदांचा मेळावा घेण्यात आला. मेळाव्यात परस्पर परिचय साहित्यविषयक अपेक्षा यावर अनेकांनी आपली मते मांडली. श्रीमती वृंदा दिवाण यांचे कथाकथन व डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या कविता वाचनाचा कार्यक्रम झाला. डॉ. माधवी वैद्य यांनी मार्गदर्शन केले. यापुढे शाखेची वाटचाल कशी असेल व पुढील योजना, कार्यक्रम कोणते असावेत यासंबंधी थोडक्यात माहिती दिली. प्रमुख कार्यवाह श्री गोपाळ कुलकर्णी यांनी आभार मानले. चहापानानंतर कार्यक्रम संपला.

## — फलटण शाखा —

**१) फलटण शाखा : विभागीय मराठी साहित्य संमेलन २०११ :** कै. प्रा. शिवाजीराव भोसले यांच्या प्रथम पुण्यतिथीचे निमित्त साधून दि. २८, २९, ३० जून २०११ मसाप फलटण शाखेतर्फे विभागीय मराठी साहित्य संमेलनाचे आयोजन करण्यात आले. शिवाजी वाचनालयापासून महाराजा मंगलकार्यालयापर्यंत ग्रंथदिंडी काढण्यात आली. बाळासाहेब अंबोले व ॲड. दस्तगीर मेटकरी यांच्या हस्ते दिंडी व शोभायात्रेचे उद्घाटन झाले. फलटणमधील सर्व शाळांतील विद्यार्थ्यांचा प्रचंड सहभाग लाभला. तसेच शहरातील अनेक मान्यवर व्यक्तींचा सहभाग होता. सायंकाळी संमेलनस्थळी बाल आनंद मेळावा झाला. त्यापूर्वी संमेलनाचे अध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी व कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांची शोभायात्रेतील सजविलेल्या बैलगाडीतून मिरवणूक काढण्यात आली होती. बालआनंद मेळाव्याच्या अध्यक्षस्थानी रेणू गावस्कर होत्या. त्यांनी श्रोत्यांशी उत्तम संवाद साधला. त्यानंतर "ही वाट वैखरीची' ही संमेलनाध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी व सौ. श्रद्धा कुलकर्णी यांनी प्रा. शिवाजीराव भोसले यांच्या जीवनावर तयार केलेली चित्रध्वनिफित दाखविण्यात आली. दुसऱ्या दिवशी सकाळी आमदार दीपक चव्हाण यांच्या हस्ते ग्रंथ प्रदर्शनाचे उद्घाटन झाले. यावेळी अध्यक्षस्थानी बापूसाहेब मोदी होते. मसापच्या कार्यवाह सौ. सुनीता राजे पवार यांनी स्वागत केले. धुळे येथील राजवाडा संशोधनकेंद्र व साताऱ्याच्या प्रकाशन संस्थेने व पुण्याच्या संस्कृती प्रकाशन संस्थेने ग्रंथप्रदर्शनात प्रत्यक्ष सहभाग घेतला होता.

अत्यंत देखण्या स्वरूपात संमेलनाचा उद्घाटन समारंभ पार पडला. संमेलनाध्यक्ष उत्तम कांबळे यांच्या हस्ते उद्घाटन झाले. तसेच विभागीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांचे अभ्यासपूर्ण भाषण झाले. मा. श्रीनिवास पाटील व विजयराव कोलते उपस्थित होते. याच समारंभात 'विवेकानंद' या स्मरणिकेचे प्रकाशन व 'फलटण वैभवदर्शन' या ग्रंथाचे प्रकाशन कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते झाले. यावेळी अनेक मान्यवरांचे हृद्य सत्कार करण्यात आले.

'मराठी भाषेचे तारक कोण, मारक कोण?' या परिसंवादाचे अध्यक्षपद प्रा. डॉ. द. ता. भोसले यांनी भूषविले. प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले.



अनुक्रमणिका

अनंत दीक्षित, अरुण ठाकूर, किशोर बेडकिहाळ, मॅक्सीन बर्नसन, डॉ. मेधा सिधये, सौ. शैलशिल्पा जाधव हे वक्ते परिसंवादात सहभागी झाले होते.

पद्मश्री लक्ष्मण माने यांची प्रकट मुलाखत अनंत दीक्षित यांनी घेतली.

सायंकाळी निमंत्रित कवींचे कवीसंमेलन प्रमोद कोपर्डे यांच्या अध्यक्षतेखाली झाले. सूत्रसंचालन उद्धव कानडे यांनी केले. डॉ. म. शि. सगरे व श्याम देशपांडे यांच्या हस्ते सत्कार करण्यात आले. व्यासपीठाला बा. भ. बोरकरांचे नाव देण्यात आले होते. नारायण सुमंत, राजा मंगसुळीकर, जयंत लंगडे, आश्लेषा महाजन, मृणालिनी जोशी, वैशाली मोहिते, अंजली महागांवकर, लता अहिवळे, दीपक करंदीकर, रमझान मुल्ला, सदानंद करंदीकर, ज्ञानेश्वर बडवे, प्रा. तुकाराम पाटील, माधव पवार, लक्ष्मीकांत रांजणे, दादासाहेब भोसले, अंजली कुलकर्णी, चंद्रकांत वानखेडे, गोकुळ पवार, राजन लाखे, डॉ. श्रीकृष्ण जोशी, निलांबरी शिर्के, प्रदीप पाटील, दुर्गेश सोनार, प्रकाश हळबे या कवींनी सहभाग घेतला.

दि. ३० जून सकाळी सातारा जिल्ह्यातील नवोदित कवींचे कविसंमेलन कोरेगाव शाखेच्या सहकार्याने राजा मंगसुळीकर यांच्या अध्यक्षतेखाली झाले. स्व. मीरदेव गायकवाड कविकट्टा असे नाव व्यासपीठाला देण्यात आले होते. कवींचे सत्कार ज्ञानेश्वर बडवे यांच्या हस्ते झाले. सूत्रसंचालन शशिकांत कांबळे यांनी केले.

दुपारी सिंधूताई सपकाळ यांची प्रकट मुलाखत विनया देसाई यांनी घेतली. नंतर 'संत साहित्य व आधुनिकजीवन' या विषयावर उल्हासदादा पवार यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. कुलगुरू डॉ. शिवाजीराव कदम यांनी शुभारंभ केला. सौ. सुनिताराजे पवार यांनी सूत्रसंचालन केले. रविंद्र येवले (फलटण), सदानंद मोरे (पुणे), डॉ. यशवंत पाटणे (सातारा), डॉ. रा. गो. प्रभुणे (कराड) या वक्त्यांनी विचार प्रकट केले.

सायंकाळी प्रा. द. मा. मिरसदार यांच्या अध्यक्षतेखाली कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम झाला. बाबा परीट (सांगली), हिम्मत पाटील (सांगली), ज्योतीराम फडतरे (सांगोला), अंजली श्रीवास्तव (करमाळा), प्रा. रवींद्र कोकरे (फलटण) व स्वत: मिरासदार यांनी कथा सांगितल्या.

संमेलनाचा समारोप माजी खासदार श्रीनिवासराव पाटील यांच्या हस्ते व प्रा. द. मा. मिरासदार यांच्या अध्यक्षतेखाली झाला. यावेळी पाच प्रातिनिधिक शेतकऱ्यांचा व संमेलनासाठी अतोनात परिश्रम घेतलेल्या सर्वांचा यथोचित सत्कार करण्यात आला.

**२) दि. २६ ऑगस्ट २०११ :** 'लेखक आमच्या शाळेत' हा अभिनव उपक्रम साजरा झाला. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले व माधव राजगुरू, महावीर जोंधळे यांनी १०वीच्या विद्यार्थ्यांशी संवाद साधला.

## — श्रीरामपूर शाखा —

**२ जुलै २०११—** श्रीमती श्यामलाताई द्रविड यांचे रवींद्रनाथ टागोर यांच्या १५० व्या जयंती वर्षानिमित्त व्याख्यान झाले.

**२७ जुलै २०११—** ॲड. रावसाहेब शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली स्व. साधनाताई आमटे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी सभा झाली. विविध क्षेत्रांतील वक्त्यांची भाषणे झाली.

**शनिवार दि. ६ ऑगस्ट २०११ रोजी** श्रीरामपूर म.सा.प शाखेच्या वतीने पावसाळी कविसंमेलन संपन्न झाले. शाखेचे अध्यक्ष ॲड. रावसाहेब शिंदे व उपाध्यक्ष अविनाश आपटे यांनी शुभेच्छा दिल्या. या कविसंमेलनाचे आयोजन कार्याध्यक्ष माजी प्राचार्य

टी.ई. शेळके यांच्या मार्गदर्शनाखाली करण्यात आले. कार्यवाह प्रा. सौ. भाग्यश्री बडे यांनी संयोजन केलेल्या या कविसंमेलनात स्वागत व प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह प्रा. डॉ. बाबूराव उपाध्ये यांनी केले.

म.सा.प. शाखेच्या ज्येष्ठ सदस्या, सेवानिवृत्त शिक्षिका – मुख्याध्यापिका सौ. श्यामला लक्ष्मीकांत द्रविड (वय ८२ वर्षे) यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली. त्यांच्या आठवणी अनेकांनी सांगितल्या.

'पाऊस' या विषयावर उपस्थित कवी-सदस्यांनी कविता सादर केल्या. डॉ. मधुकर भिडे यांनी गेय कविता सादर केल्या.

लेविन भोसले कवी महेश टंकसाळे, माजी गटशिक्षणाधिकारी के. पी. बोरूडसर प्रा. सौ. एल. आर. बोरूडे, सौ. पुष्पाताई पोखरकर, दिनकरराव पोखरकर, सौ. भाग्यश्री बडे, प्रा. डॉ. बाबूराव उपाध्ये, डॉ. कमलजितकौर बतरा, माजी प्राचार्य टी.ई. शेळके यांनी 'पाऊस' विषयावरच्या कविता सादर केल्या.

अध्यक्षीय भाषणात सौ. पुष्पाताई पोखरकर यांनी 'पाऊस' कवितेचा आढावा घेतला.

---

## – इस्लामपूर शाखा –

महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा इस्लामपूरची सन २०११ ते २०१६ अखेर नवीन कार्यकारणीची निवड झाली ती खालीलप्रमाणे–

| | | |
|---|---|---|
| १) | प्राचार्या डॉ. दीपा विवेक देशपांडे | अध्यक्ष |
| २) | डॉ. मंगल महादेव कोकाटे | कार्याध्यक्ष |
| ३) | शाहीर यशवंत ज्ञानू पवार | उपाध्यक्ष |
| ४) | शहानवाज जलालुद्दीन मुल्ला | उपाध्यक्ष |
| ५) | प्रा. सुभाष आबा खोत | कार्यवाह |
| ६) | श्रीमती वैजयंती शांताराम पेठकर | कार्यवाह |
| ७) | प्रकाश शंकर ढेंबरे | कोषाध्यक्ष |
| ८) | प्रा. दशरथ शंकर पाटील | सदस्य |
| ९) | सौ. वृषाली विलास आफळे | सदस्य |
| १०) | सर्जेराव कृष्णा कचरे | सदस्य |
| ११) | मधुकर श्रीनिवास हसमनीस | सदस्य |
| १२) | सदानंद तुकाराम पाटील | सदस्य |
| १३) | भगवानराव ज्ञानदेव मोरे | सदस्य |
| १४) | तात्यासाहेब आण्णा पाटील | सदस्य |
| १५) | सुधीर बहिरव चरापले | सदस्य |
| १६) | सदानंद मारुती बोंगाणे | सदस्य |
| १७) | धोंडीराम रघुनाथ सलगर | सदस्य |
| १८) | प्रा. शामराव ज्ञानदेव पाटील | सदस्य |

**३१ मार्च २०११ :** डॉ. विवेक देशपांडे यांच्या स्मृतिदिनानिमित्त झालेल्या कार्यक्रमासाठी प्रमुख पाहुण्या म्हणून प्रसिद्ध कवयित्री डॉ. अरुणा ढेरे उपस्थित होत्या. 'देवकथेतील स्त्री' या विषयावर त्या बोलल्या. प्रास्ताविक व स्वागत सौ. वृषाली आफळे यांनी केले. परिचय डॉ. दीपा देशपांडे यांनी करून दिला. डॉ. मंगला कोकाटे यांनी आभार मानले. यावेळी विविध क्षेत्रांतील मान्यवर उपस्थित होते.

**१६ जुलै २०११ :** प्राचार्य शरद भोसले स्मृतिदिन साजरा झाला. यावेळी महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे चे प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांचे 'प्रश्न आजचे उत्तर संतसाहित्याचे' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक व स्वागत डॉ. दीपा देशपांडे यांनी केले. आभार प्रा. दशरथ पाटील यांनी मानले. प्रा. शामराव पाटील यांचे मार्गदर्शन लाभले.

**३१ जुलै २०११ :** एकोणिसावे मराठी एक-दिवसीय साहित्य संमेलन मोठ्या उत्साहात साजरे झाले. संमेलनाचे अध्यक्षपद संत-साहित्याचे गाढे अभ्यासक डॉ. रामचंद्र देखणे, पुणे यांनी भूषविले.

उद्घाटन प्रसिद्ध ग्रामीण कथाकार प्रा. दि. बा. पाटील यांच्या हस्ते झाले. तर स्वागताध्यक्षपद प्रा. दशरथ पाटील यांनी भूषविले. सूत्रसंचालन सौ. रोझा किणीकर यांनी केले.

दुसऱ्या सत्रात कथाकथनाचा कार्यक्रम झाला. श्री. संपतराव चव्हाण, बहिरेवाडी, श्री. जीवन सावंत – गोमेवाडी, श्री. अमितकुमार शेलार, सातारा यांच्या कथांनी कार्यक्रमात बहार आणली. सत्राचे नियोजन प्रा. सुभाष खोत यांनी केले. तिसऱ्या सत्रात निमंत्रितांचे कविसंमेलन झाले. अध्यक्षस्थानी चंदगडचे राजू पोतदार होते. गोविंद पाटील-गारगोटी, बबलू वडार-कोडोली, रमजान मुल्ला-नागठाणे, लता ऐवळे-अंकलखोप यांचा सहभाग होता. नवोदित कवींनीही आपल्या कविता सादर केल्या.

अध्यक्षा डॉ. दीपा देशपांडे, प्रा. शामराव पाटील, सौ. वृषाली आफळे, प्रा. डॉ. मंगला कोकाटे, श्री. प्रकाश ढेबरे, शाहीर यशवंत पवार, श्री. शहानवाज मुल्ला, श्रीमती वैजयंती पेठकर या पदाधिकाऱ्यांनी संमेलनाचे नियोजन केले.

**२१ ऑगस्ट २०११ :** डॉ. शिवाजीराव घोरपडे स्मृतिदिन साजरा झाला. या आरोग्याला वाहिलेल्या कार्यक्रमात डॉ. किरण रूकडीकर, कोल्हापूर यांचे 'स्थूलता-समज-गैरसमज' यावर व्याख्यान झाले. डॉ. संजय घोरपडे यांनी परिचय करून दिला. प्रास्ताविक व स्वागत प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांनी केले व आभार सौ. वृषाली आफळे यांनी मानले. संयोजन डॉ. संजय घोरपडे, श्री. सचिन घोरपडे व प्रा. शामराव पाटील यांनी केले.

---

## – सोलापूर शाखा –

(कार्यवृत्त मे २०११ ते ऑगस्ट २०११)

**दिनांक १५ मे २०११** रोजी म.सा.प. शाखा सोलापूर व हिराचंद नेमचंद वाचनालयाच्या वतीने भावपूर्ण चित्रपटगीतांनी संपूर्ण महाराष्ट्राला ज्यांनी मोहून टाकले अशा जगदीश खेबूडकरांना त्यांच्याच रसिल्या गीतांनी श्रद्धांजली वाहिली. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्यवाह डॉ. व्यंकटेश नुले यांनी केले आणि अध्यक्ष कवी डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली यांनी खेबूडकरांच्या गीतांचा परामर्श घेतला. यावेळी जयंत राळेरासकर व मोहनसोनी यांनी त्यांची गाजलेली गीते ऐकविली. सदर कार्यक्रमास कवी दत्ता हलसगीकर, डॉ. सुहास पुजारी, दत्ता गायकवाड, पद्माकर कुलकर्णी, डॉ. पी. के. जोशी, ॲड. रजपूत, म. सा. प. ची कार्यकारिणी व सोलापुरातील रसिकांची उपस्थिती लक्षणीय होती.

**दिनांक २ जुलै २०११** रोजी सेवासदन प्रशाला येथे 'आषाढस्य प्रथम दिवसे' (महाकवी कालिदास यांच्या जयंती निमित्ताने) हा कार्यक्रम आयोजित केला. सदर कार्यक्रमात बोलताना व्याख्यात्या प्रा. डॉ. ऋचा कांबळे म्हणाल्या, "महाकवी कालिदास हे संदेश-काव्याचे जनकच आहेत. स्त्रीसृष्टी आणि निसर्ग यांनी ओतप्रोत भरलेले कालिदासांचे प्रत्येक काव्य व नाटिका आहेत. त्यांच्या काव्यात निसर्गातील बदलांचा प्रवास बारकाईने टिपलेला आढळतो. मसापचे कार्याध्यक्ष प्रा. डॉ. सुहास पुजारी यांनी प्रास्ताविक केले. डॉ. व्यंकटेश नुले यांनी पाहुण्यांची ओळख करून दिली. कवी मारुती कटकधोंड यांनी आभार मानले. या कार्यक्रमास अध्यक्ष डॉ. बोल्ली, जे. जे. कुलकर्णी, दत्ता हलसगीकर, पद्माकर कुलकर्णी, राजेंद्र भोसले व शहरातील रसिकांनी चांगलीच दाद दिली.

**दि. १ ऑगस्ट २०११** रोजी लोकशाहीर आण्णा भाऊ साठे यांच्या जयंतीनिमित्त प्रा. डॉ. एम.

डी. शिंदे यांचे व्याख्यान आयोजित केले. डॉ. शिंदे यांनी आण्णा भाऊंच्या जीवनावर आणि साहित्य कलाकृतीवर विस्तृत प्रकाश टाकला. प्रथम डॉ. व्यंकटेश नुले यांनी आण्णा भाऊ साठे यांच्या सान्निध्यात घालविलेले आठ दिवस हे अनुभवकथन केले. कथाकार योगीराज वाघमारे यांनी पाहुण्यांची ओळख व प्रास्ताविक केले. अध्यक्ष डॉ. बोल्ली यांनी आपले अध्यक्षीय मनोगत व्यक्त करताना 'आण्णा भाऊ साठे हे दलित साहित्यातील मानदंड, एक मैलाचा दगड आणि वास्तवाचे भान ठेवणारे रत्न होते' असे नमूद करून त्यांचे काही किस्से सांगितले.

**दिनांक १३ ऑगस्ट २०११ :** आचार्य अत्रे जयंतीनिमित्त 'शोध कवितेचा' हा कार्यक्रम मसाप शाखा सोलापूर आणि अत्रेप्रेमी तात्या काटकर यांच्या संयुक्त विद्यमाने ॲम्पी थिएटरमध्ये आयोजित केला. यात गौरी गोळे, भाग्यश्री भागवत, डॉ. राजश्री जोशी, धनंजय दीक्षित, महेश पाटणकर, वंदना जोगळेकर या पुण्याच्या कलाकारांनी आचार्य अत्रे यांच्या विविध कविता अभिनयासह सादर केल्या. त्यांस अनिरुद्ध देसाई, श्रीनंद मेहेंदळे, सिद्धा पाटणकर यांनी संगीताची साथ दिली. यावेळी आजींच्या जवळी घड्याळ कसले, श्रावणमासी हर्ष मानसी, किती दिसते ती कपिला गोजिरवाणी, घाल घाल पिंगा वारा माझ्या परसात, पडू आजारी मौज वाटे भारी वगैरे. २५ कवितांच्या सादरीकरणाला शेकडो रसिकांनी भरभरून दाद दिली.

प्रास्ताविकात डॉ. व्यंकटेश नुले यांनी कार्यक्रमाची माहिती विशद केली. डॉ. बोल्ली यांनी अत्र्यांच्या साहित्यविश्वाचे मोल विशद केले. या कार्यक्रमास पद्माकर कुलकर्णी, राजेंद्र भोसले, गिरीश दुनाखे यांनी विशेष सहकार्य केले.

---

## — ठाणे शाखा —

**(१) रविवार, दि. १७ एप्रिल २०११, या दिवशी प्रा. डॉ. राधिका पारसनीस —** गुप्ते यांचे 'मानवी जीवनात नवनाथांचे माहात्म्य' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते.

**(२) शनिवार, दि. ११ जून २०११** रोजी, शाखेच्या बत्तिसाव्या वर्धापन दिनानिमित्त डॉ.अरुण जोशी यांचे 'लोकहितवादी – गोपाळ हरी देशमुख' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते.

---

### नवे आजीव सभासद, पाटण

७३) प्रा. सौ. अरुंधती चंद्रकांत पाटील
७४) श्री. बाळकृष्ण किसन सुतार
७५) श्री. दिपक शंकर कांवळे
७६) श्री. सचिन नथुराम मगरे
७७) श्री. प्रल्हाद शिवराम पवार
७८) श्री. शिवाजी लक्ष्मण साळुंखे
७९) श्री. नवनाथ भिवाजी कदम
८०) सौ. मेघा अशोक कुलकर्णी
८१) सौ. सुमन राजेंद्र जाधव
८२) श्री. हिराजी बाबुराव सोनावले
८३) कु. हेमा बाबुराव रणदिवे
८४) श्री. काशिनाथ अंतू कदम
८५) श्री. उत्तम परशराम पाटील
८६) श्री. रामचंद्र श्रीरंग शेलार
८७) श्रीमती. सुषमा पांडुरंग देशपांडे
८८) श्री. संभाजी निवृत्ती पवार
८९) श्री. जोतीराम आबासाहेब कुंभार
९०) श्रीमती विद्यादेवी ज्ञानदेव यादव
९१) श्रीमती निर्मला ज्ञानदेव देसाई
९२) श्री. वामन कृष्णा देसाई
९३) श्री. गणेश साहेबराव देशमुख
९४) श्री. हंबीरराव बाळासाहेब यादव
९५) श्री. लक्ष्मण बंडू जगदाळे
९६) श्री. विनोद अशोक चव्हाण
९७) श्री. विष्णू नारायण घाडगे
९८) श्री. श्रीरंग हरी कदम
९९) श्री. विलासराव पांडुरंग क्षिरसागर
१००) प्रा. जमीर ईलाही मोमीन

◇◇◇

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

**पहिला दिवाळी अंक : 'संवेदना' दिवाळी २०११**

**अंकाची वैशिष्ट्ये**

- मराठी मनाशी महाराष्ट्र साहित्य परिषदेचे असलेले अनुबंध दृढ करणारा अंक
- कसदार अशा चिंतनशील आणि सृजनशील साहित्याचा समावेश
- 'मराठी संस्कृती : सामर्थ्य आणि मर्यादा' या जिव्हाळ्याच्या विषयावर परिसंवाद. सहभाग : डॉ. गंगाधर पानतावणे, प्रा. रा. ग. जाधव, डॉ. के. रं. शिरवाडकर, डॉ. मॅकसीन बर्नसन, डॉ. माधव गाडगीळ, डॉ. तारा भवाळकर, डॉ. रझिया पटेल, श्री. दिनकर गांगल, मंगला गोडबोले आदी मान्यवर.
- आंतरराष्ट्रीय कीर्तीचे शास्त्रज्ञ डॉ. जयंत नारळीकर लिहीत आहेत मराठी विज्ञानकथांविषयी.
- आजचे आघाडीचे प्रज्ञावंत लेखक अच्युत गोडबोले यांच्या विविधांगी व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडविणारी मुलाखत, घेत आहेत : डॉ. नीलिमा गुंडी.
- मराठी रंगभूमीशी आणि नाट्यचळवळीशी दीर्घकाळ निगडित असलेल्या ज्येष्ठ अभिनेत्री सुलभा देशपांडे यांच्याशी संवाद साधत आहेत : इरावती कर्णिक.
- 'महाराष्ट्रातील आदिवासींचा ज्ञानकोश' या आपल्या बृहद्-संशोधन-प्रकल्पाविषयी लिहीत आहेत प्रसिद्ध लेखिका : कविता महाजन.
- 'आजचे तरुण काय वाचतात?' : सर्वेक्षणाच्या आधारे तरुण मनाचा कानोसा घेत, त्या अनुषंगाने वाचनसंस्कृतीच्या सद्य:स्थितीवर प्रकाश टाकत आहेत मनोहर सोनवणे.
- स्त्रियांच्या सक्षमीकरणात महत्त्वाची भूमिका बजावणाऱ्या पुणे परिसरातील महिला बचतगटांच्या कार्याचा मागोवा घेत आहेत : अंजली कुलकर्णी.
- विविध अनुभवांवरील लालित्यपूर्ण शैलीतील लेखन –
  सहभाग : आशा बगे, नरेंद्र चपळगावकर, फ्रान्सिस दिब्रिटो, श्रीकांत इंगळहळ्ळीकर
- मराठीच्या विविध बोलींमधील ललित लेखनाचा खास विभाग. सहभाग : प्रा. विठ्ठल वाघ, महादेव मोरे, अशोक कौतिक कोळी, वाहरू सोनावणे आदी मान्यवर
- राजन गवस, अवधूत परळकर आदींच्या दर्जेदार कथा, तसेच मराठी काव्याच्या निर्मितिकेंद्रांच्या विस्ताराचे दर्शन घडविणारा समृद्ध काव्यविभाग.
  'इवलेसे रोप' : मुलांच्याच शब्दांत मुलांची अभिव्यक्ती सादर करणारा खास विभाग.

संपादक : डॉ. नीलिमा गुंडी, मनोहर सोनवणे

संपादन सहकार्य : अंजली कुलकर्णी, प्रशांत खुंटे

प्रकाशक : प्रा. मिलिंद जोशी (प्रमुख कार्यवाह)

म.सा.प.च्या आजीव सदस्यांना खास सवलत आपली प्रत लवकर नोंदवा.

आपले

| **सुनील महाजन** | **प्रा. मिलिंद जोशी** | **डॉ. माधवी वैद्य** |
|---|---|---|
| (कोषाध्यक्ष) | (प्रमुख कार्यवाह) | (कार्याध्यक्ष) |



अनुक्रमणिका

# (नवीन सभासदत्वाकरिता आवेदनपत्र)

मा. प्रमुख कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११ ०३० यांसी

दिनांक :

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची घटना व नियमावली (दि. १ जानेवारी २००१ पासून अमलात आलेल्या घटनेनुसार) यांना अनुसरून मी या संस्थेचा/ची आजीव सभासद होऊ इच्छितो/इच्छिते.

**वैयक्तिक माहिती**

आडनाव : प्रथम नाव : वडिलांचे/पतीचे नाव :

जन्मदिनांक : शिक्षण : लिंग : पुरुष / स्त्री

व्यवसाय : साहित्य विषयक :

संपूर्ण पत्ता :

देश : राज्य : जिल्हा :

शहर : पिन कोड :

दूरभाष क्र. : भ्रमणभाष क्र. : इ-मेल :

**सभासद माहिती**

सूचक क्रमांक : सूचकाचे नाव :

अनुमोदक क्रमांक : अनुमोदकाचे नाव :

**देयक तपशील**

सदस्यत्व : रक्कम : भरणा पद्धत :

बँकेचे नाव : दिनांक : पावती क्रमांक :

**ग्रंथालयाची वर्गणी**

वर्गणी : अनामत :

भरणा पद्धत : बँकेचे नाव : पावती क्रमांक :

वाचक क्रमांक : Valid Till :

सभासद क्रमांक :

सही : ____________________

टीप– आजीव सभासद वर्गणी रु. १०००/- (चेक असल्यास रु. २५/- अधिक), ग्रंथालय वर्गणी रु. २००/- अनामत ठेव रु. ४००/-, एकूण रु. १६००/- (रु. १६२५/-)



अनुक्रमणिका








(विद्यमान सभासदांनी अद्ययावत माहिती भरून पाठविण्यासाठी)

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० दूरध्वनी : (०२०) २४४७५९६३/३२५४५६५९
वेबसाईट : www.masapapune.org स्थापना : २७ मे १९०६ नोंदणी क्र. ४१९

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या आजीव सभासदांची माहिती अद्ययावत करण्यासाठी पुढील माहिती त्वरित पाठवावी, ही विनंती.

आपला,
प्रा. मिलिंद जोशी
(प्रमुख कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे)

सभासद क्रमांक [ ]

**वैयक्तिक माहिती**

आडनाव : [ ] प्रथम नाव : [ ] वडिलांचे/पतीचे नाव : [ ]

जन्मदिनांक : [ ] शिक्षण : [ ] लिंग : पुरुष / स्त्री

व्यवसाय : [ ] साहित्य विषयक : [ ]

संपूर्ण पत्ता : [ ]

देश : [ ] राज्य : [ ] जिल्हा : [ ]

शहर : [ ] पिन कोड : [ ]

दूरभाष क्र. : [ ] भ्रमणभाष क्र. : [ ] इ-मेल : [ ]

सही : ____________________












महाराष्ट्र
साहित्य
परिषद

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : July to September 2011
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*



बुक-पोस्ट

येणें वाचडें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३